# कल्पना-विलास



एप्रिल १९४०

लेखक :
रा. ग. कुंभोजकर
एम्. ए., बी. टी.

किंमत १॥ रुपया ]

आगामी

कादंबरी

# कांचन




लेखक :

रा. ग. कुंभोजकर

एम्. ए.

सातारा

# प्रस्तावना.

माझे स्नेही श्री. रा. ग. कुंभोजकर यांचा हा पहिला लघुकथासंग्रह आज प्रसिद्ध होत असला तरी महाराष्ट्रांतील वाचकांना त्यांचा नव्यानें परिचय करून देण्याचें कारण आहे असें मला वाटत नाहीं. गेल्या चार पांच वर्षांत निरनिराळया नियतकालिकांतून अनेक लघुकथा लिहून त्यांनीं उदयोन्मुख कथालेखकांत उच्च स्थान मिळविलें आहे. त्यांच्या या लघुकथा संग्रहाला प्रस्तावनेच्या पाठराखणीची वस्तुतः कांहींच आवश्यकता नव्हती. आणि तसें मी बोलूनहि दाखविलें. परंतु त्यांच्या विशेष आग्रहाला नकार देणेंहि मला कठीण वाटूं लागलें आणि म्हणूनच प्रस्तावनेदाखल हे चार शब्द लिहीत आहे.

श्री. कुंभोजकर यांच्या बऱ्याचशा लघुकथा मी वेळोवेळीं वाचीत होतों; आतां त्या सामग्र्यानें वाचावयास मिळाल्या. त्यांच्या लघुकथांचें जें वैशिष्ट्य पूर्वी मनांत भरलें तेंच आतांहि दृढ झालें. त्यांची सृष्टि अगदीं परिचित वाटते हेंच तें वैशिष्ट्य होय. पतिपत्नीमधील लहानसा प्रसंग, एखाददुसरी स्वभावाची छटा, नित्य परिचयांतील एखादी कल्पना, किंवा सहज सभोंवतीं दृष्टी फेंकल्यास आढळून येणारी घटना—इत्यादि विषयाभोंवती त्यांच्या लघुकथा केंद्रित झाल्या आहेत. भावनांचा दुर्दम्य कल्लोळ किंवा कल्पनासृष्टींतच सांपडणारे दुर्लभ प्रसंग यांचा मागमूसहि त्यांच्या कथांमधून सांपडावयाचा नाहीं. सर्व वातावरण कसें अगदीं परिचित. चेहरे ओळखीचे. आपणहि या गोष्टी प्रत्यक्ष पाहिलेल्या किंवा अनुभवलेल्या. त्यामुळें या सर्व वातावरणांत एक प्रकारची सहजता आली आहे.

वातावरणाच्या सहजतेप्रमाणेंच ओघवती भाषेचीहि सहजता एकदम डोळ्यांत भरते. आलंकारिक वर्णनें, कोट्या, विनोदवचनें यांची पाखरण

विपुलतेनें करून गोष्टींना अस्वाभाविक स्वरूप त्यांनीं कोठेंहि आणिलें नाहीं. असें असूनहि त्यांच्या भाषेंत हे गुण नाहींत असें नाहीं. वर्णनाच्या किंवा कथेच्या ओघांत अस्वाभाविकतेचा दोष पदरांत न येतां या गुणांचा उपयोग करून भाषा सजविलेली दिसून येईल. पण तें प्रमाण त्यांनीं असें साधलें आहे कीं भाषेच्या सहजतेला कोठेंहि बाध न यावा.

या कथासंग्रहांत मला विशेष आवडलेली गोष्ट म्हटली म्हणजे त्यांची विनोददृष्टि. त्यांचा विनोद हा कांहींसा स्वभावनिष्ठ व कांहींसा प्रसंगनिष्ठ आहे. परंतु तोहि ओढून ताणून आणलेला नाहीं. त्यांच्या कथा वाचीत असतांना हास्याचे स्फोट होणार नाहींत. परंतु सहृदय वाचकांच्या गालांवर वरचेवर सुरकुत्या मात्र खास पडतील. कांहीं कथा मूलतःच विनोदी आहेत. परंतु प्रायः सर्वच कथांमधून विनोदाचा हा सूक्ष्म धागा दृष्टीस पडतो.

'महाकवि' 'अपवाद' 'आमचे हक्क' 'आमची खाणावळ' या लघुकथा श्री. कुंभोजकर यांच्या विनोद वृत्तीच्या द्योतक आहेत. स्वभावनिष्ठ आणि प्रसंगनिष्ठ अशा दोन्ही तऱ्हेचा विनोद त्यांना चांगला साधतो हें या कथावरून दिसून येईल. आणि त्यांचा हा विनोद सोज्ज्वळ आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. त्यामध्यें विडंबन, उपहास, उपरोध अशासारख्या विनोद–निर्मितीच्या तीव्र उपायांचा त्यांनीं कोठेंहि अवलंब केला नाहीं हें विशेष आहे. एखाद दुसरी शाब्दिक कोटी सांपडेल पण त्याकरितां अट्टाहास नाहीं. मानवी स्वभावाचे विशिष्ट नमुने विनोदीदृष्टीनें त्यांनीं आपल्यापुढें मांडले आहेत आणि त्याचा उठाव करण्याकरितां विनोद–गर्भ प्रसंगांची त्याला जोड दिली आहे. ज्या कथा किंचित् गंभीर स्वरूपाच्या आहेत त्या ठिकाणींहि त्यांची ही सौम्य विनोदीवृत्ति डोकावते. परंतु सर्वत्र सोज्ज्वळता आढळेल. त्यांचा विनोद कोणालाहि खुपायचा नाहीं, रुतायचा नाहीं.

श्री. कुंभोजकर यांच्या या कथा महाराष्ट्रांतील निरनिराळ्या नियतकालिकांमध्यें प्रसिद्ध झालेल्या आहेत. हीं नियतकालिकें भिन्न भिन्न

ठिकाणीं प्रकाशित होत आहेत आणि प्रत्येकाचें उद्दिष्टहि भिन्न. किर्लोस्कर, स्त्री, मनोहर, यशवंत, पारिजात, कला, ज्योत्स्ना, चंद्रकला, झारापकर या आणि इतर ठिकाणीं आजपर्यंत त्यांच्या कमींत कमी साठ सत्तर तरी लघुकथा प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यावरून त्यांची लोकप्रियता जशी अजमा-वितां येतें त्याचप्रमाणें कथाविषयांत वैचित्र्य आणण्याचें त्यांचें कसबहि ध्यानांत येतें. थोड्यांच अवधींत त्यांनीं जें विपुल लेखन केलें आहे त्यावरून त्यांच्या भावी लेखन संसाराबद्दल उज्ज्वल अशा वाटूं लागते. विपुलतेबरोबरच त्यांच्या लेखनांत वैचित्र्यहि आहे. ‘ हिरवी ज्योत ’ या कथेंत अंधभक्तीची निर्भर्त्सना हें साधेंच तत्त्व गोविलें आहे, तर ‘ दोन ओढे ’ ही लघुकथा रूपकात्मक आहे. मनोविश्लेषणात्मक म्हणतां येईल अशा त्यांच्या दोन कथा ‘ विमल लॉंड्री ’ आणि ‘ अतृप्त वात्सल्य ’ या विशेष चांगल्या वठल्या आहेत. मानसशास्त्रीय ग्रंथांतून अस्वाभाविक मनोघडणेचीं उदाहरणें दिलेलीं असतात. त्यांपैकीं कांहीं कल्पनांचा लघुकथेकरतां नितांत सुंदर असा उपयोग लेखकानें करून घेतला असल्याचें या दोन्ही लघुकथावरून दिसून येईल. ‘ वेड्याचें मानसशास्त्र ’ हा स्वतंत्र विषय आहे आणि त्यामध्यें कितीतरी गंमती वाचावयास मिळतात. वेडे झालेल्या लोकांबद्दल सामान्यतः तिरस्कारच दर्शविला जातो परंतु त्यांच्या वेडाचीं कारणें कळलीं म्हणजे याच लोकांच्याबद्दल आपल्या मनामध्यें सहानुभूति निर्माण होते. प्रेमभंगामुळें निराश होत्साते वेडे झालेले लोक बऱ्याच वेळां पाहण्यांत येतात. अशा एका व्यक्तीचें कारुण्यपूर्ण चित्र ‘ विमल लॉंड्री ’ मध्यें काढलें आहे. कल्पना पूर्ण परिचयाची असली तरी गोष्टीची घडण नाविन्यपूर्ण आहे. विशेषतः त्यांतील सूचकता तर कारुण्याला पोषक झाली आहे. ‘ अतृप्त वात्सल्य ’ ही लघुकथा त्यांतील कल्पनानाविन्यामुळें बहारीची वठली आहे. अपत्य–लालसेच्या प्रदर्शनाचा हा मार्ग नाविन्यपूर्ण असला तरी मानसशास्त्राला धरून आहे.

स्त्री–जीवनावरील त्यांच्या कथा पाहिल्या म्हणजे स्त्री हृदयाचें हळुवार हातानें आविष्करण करण्याची हातोटी त्यांना चांगलीच साधली अस-ल्याचें दिसून येईल. स्त्री–जीवनाचें चित्रण करतांना नुकत्याच संसार

थाटलेल्या स्त्रियांकडे त्यांचा ओढा अधिक आहे. 'पैशाचें मोल', 'निसर्ग आणि मानव', 'सुखाचे क्षण', 'अरुंधतीचीं मनोराज्यें', 'जबाबदारीची जाणीव,' 'हातावरील रेषा' इत्यादि कथांमध्यें संसाराच्या सुरुवातीला पतिपत्नीमध्यें जो भिन्न प्रकृतिधर्मानें बेबनाव होतो परंतु अखेरीस प्रेमाचा विजय होऊन दोघेहि सुखानें कसे नांदायला लागतात याची मधुर चित्रें आपणाला पहावयास सांपडतात. संसारांतील लेखकाचें अनुभव कदाचित् या प्राथमिक अवस्थेपुरतेंच आतांपर्यंत मर्यादित असतील आणि म्हणूनच यासारख्या लघुकथांचें प्राबल्य सांपडत असावें असें वाटतें. तथापि हा एवढा सारखेपणा आढळला तरी स्वभावचित्रणांत वैचित्र्य दिसून येतें. विशेषत: स्त्रियांच्या नाजूक भावना आणि संसारांतील लहानसहान आशा–आकांक्षा यांचे उल्लेख मोठे मजेदार वाटतात. या भावना सर्व सामान्य आहेत पण त्यांचे आविष्करण कलापूर्ण झालेलें आहे.

लघुकथा म्हणजे कॉलेजमधील मुलामुलींच्या प्रणयचेष्टा असें कांहींसें समीकरण अलीकडे पडूं पाहत आहे. श्री. कुंभोजकर हे तरुण आहेत; कॉलेजमध्यें विद्यार्थि असल्यापासूनच त्यांनीं आपल्या लेखन संसारला सुरवात केली आहे. परंतु तरुणतरुणींच्या विवाहपूर्व प्रणयावर आधारलेली एकहि गोष्ट या ठिकाणी वाचकांना सापडणार नाहीं. लघुकथेला आपल्या सभोंवतीच्या जीवनांत किती तरी विषय आहेत. आपली दृष्टि तिकडे जात नाहीं एवढेंच. श्री. कुंभोजकर यांनीं या ठराविक चाकोरीच्या बाहेर जाऊन परिचित जीवनाच्या दुसऱ्या अनेक बाजू चित्रणयोग्य असतात हें सोदाहरण दाखविले आहे. प्रणयाच्या केंन्द्राभोवतीं घिरट्या घालणाऱ्या नवीन लघुकथा-लेखकांना ही दृष्टि देण्याचें कार्य प्रस्तुत कथासंग्रह करील अशी आशा वाटतें.

इंग्लिशमध्यें Litght lierature म्हणून एक वाङ्मयप्रकार आहे. नित्याच्या जीवनांतले, तुम्हां आम्हां सर्वांच्या अनुभवांतले असे प्रसंग थोड्याफार विनोदी दृष्टीनें चित्रित करावयाचें असा हेतू या वाङ्मय प्रकारचा असतो. वाङ्मयाचें हें दालन श्री. कुंभोजकरांच्या प्रतिभेला

चांगलेंच मानवतें असें मला वाटतें. लघुकथांचें वातावरण विद्यालयीन जीवनापासून तों खेड्यांतील पाटील अन् मास्तर यांच्या जीवनापर्यंत विस्तृत घेतलें आहे. स्त्रीस्वभावाचेंहि दिग्दर्शन हळुवार हातानें ठिकठिकाणीं केलें आहे, परंतु हें सर्व नित्य परिचयाचें वाटतें. तसेंच या वातावरणाचें चित्रणहि मनाला उत्साह देणारें आहे. जीवनांतील कटु अनुभव घेऊन त्याचा काळा कोळसा उगाळीत बसण्यानें आपल्या विषण्णतेंत अधिकच भर पडते. आपलें जीवन अगोदरच कंटकमय. निदान मनरंजनाकरितां आपण जें वाङ्मय हातीं घेणार त्यानें तरी या जीवनाची दुःखपूर्ण बाजू एकसारखी कां रंगवित बसावी? जग हें असें आहे हें दाखवावयाचेंच, पण तें दाखवितांना विनोददृष्टीचा चष्मा डोळ्यांवर ठेवावयाचा म्हणजे कटुता कळूनहि मनाला उल्हास वाटतो आणि याच दृष्टीनें Light literature हा वाङ्मयप्रकार लिहिला जातो. श्री. कुंभोजकरांच्या लेखनांत मला या वाङ्मयप्रकारचे गुण बऱ्याच मोठ्या प्रमाणांत दिसतात.

लघुकथाच्या तंत्राच्या दृष्टीनें या संग्रहांतील सर्व कथा एकाच दर्जाच्या आहेत असें मात्र म्हणवत नाहीं. यांतील एक दोन कथा गाळल्या असत्या तरी चाललें असते. लघुकथेंतील केन्द्रीभूत कल्पनेची उभारणी प्रायः निर्दोष झाली आहे परंतु कथेचा शेवट करण्यांत एकदोन ठिकाणीं घाई झाली आहे असें वाटते. 'अरुंधतीचीं मनोराज्यें' या लघुकथेची उभारणी हृद्य आणि स्त्रीस्वभावानुसार वाटते. परंतु अगदीं साध्या प्रसंगामुळें नायकाच्या स्वभावामध्यें चुटकीसरसें जें परिवर्तन घडून येतें तें मात्र तितकेंसें पटत नाहीं. मनुष्याच्या स्वभावांत पालट पडतो. वरचेवर येणारें अनुभव हे तरी त्याला कारणीभूत होतात. किंवा एखादाच प्रसंग इतका गंभार स्वरूपाचा असतो कीं त्याचा परिणाम मनावर होऊन स्वभाव-परिवर्तन घडून येतें. उपरिनिर्दिष्ट कथेमध्यें मात्र वर्णिलेला प्रसंग स्वभावपरिवर्तनास समर्थ आहे असें म्हणवत नाहीं. 'जबाबदारीची जाणीव' या कथेमध्यें कल्पनेची उभारणी आणि कथेचा शेवट दोन्हीहि चांगली साधली आहेत.

लघुकथांचा हा संग्रह प्रसिद्ध करून श्री. कुंभोजकर हे आपल्या वाङ्मय संसारास प्रारंभ करीत आहेत. त्यांचा पुढील संसार उज्ज्वल होईल अशी चिन्हें प्रस्तुतच्या पुस्तकांत माझ्याप्रमाणें अनेक वाचकांनाहि दिसतील अशी मला खात्री वाटतें. आणि म्हणूनच त्यांच्या हातून उत्तरोत्तर सरस आणि कलापूर्ण वाङ्मय–निर्मिति होवो अशी सदिच्छा प्रकट करून हा छोटेखानी प्रस्तावना लेख संपवितों.

सातारा,
ता. २८ मार्च १९४०.

**श्री. रा. पारसनीस.**

---

## आभार

मुखपृष्ठांवरील चित्र किर्लोस्करवाडीचे चित्रकार श्री. शं. तु. माळी यांनीं तयार केलें आहे.

प्रकाशक.

---

# अनुक्रमणिका.



# पैशाचें मोल : १

नव्या संसाराला सुरुवात करण्यापूर्वी आपण किती बेत करीत असतो ! किती निश्चय करीत असतो ! पण संसाराला सुरुवात होतांच आपले सारे बेत आणि सारे निश्चय मधल्यामध्येंच गारठून गेलेले आपण उघड्या डोळ्यांनीं पाहतों.

पण माझा एक बेत, एक निश्चय इतका दृढ होता कीं तो गारठून गेलेला उघड्या डोळ्यांनीं पाहण्यापेक्षां डोळे कायमचे मिटण्याचेंही मी खुशाल पत्करलें असतें. तो निश्चय असा कीं जन्मांत कर्ज म्हणून होऊं द्यायचें नाहीं. अगदीं तंतोतंत वर्णन करायचें तर माझा हा केवळ

निश्चयच नव्हता. माझ्या आयुष्याची नौका ज्या थोड्याशा तत्त्वांनीं हाकारली जात होती त्या तत्त्वांपैकीं हें एक तत्त्व होतें. या तत्त्वाला माझ्या दृष्टीनें इतकें महत्त्व येण्यास कारणही तितकेंच बलवत्तर होतें. बाबांची सारी हयात कर्ज उपसण्यांत आणि तें परत करण्यांतच खर्च झाली होती. कर्ज झालें असलें म्हणजे जिवाला किती यातना होतात या गोष्टीचा त्याना चागला अनुभव होता आणि ज्या ज्या वेळीं मला उपदेशाच्या चार गोष्टी सांगण्याचे प्रसंग येत त्या त्या वेळीं बाबा मला बजावीत 'केशव, जगांत वावरण्यापूर्वी एक गोष्ट चागली शिकून ठेव. बाबारे, कर्ज म्हणून कधीं होऊं देऊं नकोस.' कर्ज हा शब्द कानीं पडतांच माझ्या नजरेसमोर बाबांची प्रेमळ पण सदा कष्टी मूर्ती उभी राहते. कर्ज न होऊं देण्याबद्दल माझा एवढा कटाक्ष कां हें आतां तुमच्या ध्यानीं आलें असेल.

मी बी. ए. झाल्यावर सुदैवानें मला लौकरच नोकरी लागली आणि पुढें थोड्याच दिवसांनीं माझा विवाह झाला. पगार आणि अवांतर मिळून मला दरमहाचे पन्नास-पंचावन रुपये मिळत. शिवाय आमचें जुनें घर मी भाड्यानें दिलें होतें, त्याचें भाडें दर महिन्यास वीस रुपये येई. म्हणजे साधारणपणें आमची सुखवस्तु लोकांतच गणना होई.

अशा रीतीनें महिन्याच्या काठीं मिळणाऱ्या पाऊणशे रुपयांचे मी तीन विभाग केले होते—प्रपंचाचा चालू खर्च, प्रपंचाचा कायम स्वरूपाचा व अधीमधीचा होणारा खर्च आणि बँकेंत ठेवावयाची रक्कम. घरभाड्याची रक्कम जशीच्या तशीच बँकेंत ठेवण्याकडे माझा कटाक्ष असे आणि इतर दोन विभागांचे खर्च माझ्या पगारांत भागविण्याचा मी प्रयत्न करीत असे.

आमच्या संसाराच्या सुरवातीचें वर्ष मोठ्या आनंदांत गेलें. त्या वर्षी दुसऱ्या विभागाचा खर्च बराच झाला होता; पण बँकेंत शिल्लक पडावयाची ती पडली होती. माझें तत्त्व अबाधित राहिलें याबद्दल मला आनंद होत होता पण त्या वर्षाचे शेवटीं असा एक प्रसंग घडून आला

कीं त्यायोगें माझ्या अबाधित राहिलेल्या तत्त्वास धक्का बसणार अशी मला भीती वाटूं लागली. इतकेंच नव्हे तर त्या वेळेपासून आमच्या संसारांत रागाचे आणि असंतोषाचे उन्हाळी वारे यथेच्छ वाहूं लागले.

प्रसंग असा होता—त्या वर्षाच्या शेवटीं माझी पत्नी माहेरपणासाठीं माहेरीं जाणार होती. माहेरीं जातांना कांहीं नवा मोलाचा अलंकार अंगावर असावा अशा इच्छेनें म्हणा किंवा आपल्या सासरचा दिमाख माहेरीं दाखविण्याच्या इच्छेनें म्हणा अथवा आपला नवरा आपल्या मुठींत आहे आणि आपण म्हणूं ती गोष्ट तो आढेवेढे न घेतां बेलाशक करून टाकतो हें सिद्ध करण्यासाठीं म्हणा तिनें मला एक छानदारशीं नथ विकत घेऊन येण्यास सांगितलें. प्रथम प्रथम तिच्या मागणीकडे मी लक्षच दिलें नाहीं. पण पुढें अगदीं पाटीमागें लकडाच लागला, तेव्हां सराफाच्या दुकानीं जाऊन किंमतीची चौकशी करण्याशिवाय इलाज राहिला नाहीं. एका रविवारीं मी सराफाच्या दुकानीं जावयास निघालों तेव्हा माझ्याबरोबर येण्याचा तिनेंही हट्ट घेतला. आतां आली पंचाईत! इला न्यावी तर मध्यम किमतीची मी पसंत केलेली नथ इला पसंत पडणार नाहीं. आणि तिनें पसंत केलेली नथ भारी किमतीची म्हणून मला पसंत पडणार नाहीं! बरें न न्यावी तर लागलीच असंतोषाला सुरवात! तेव्हां मी केलें काय, चट्कन् कुठल्याशा एका जरूरीच्या कामाची आठवण झाल्यासारखें केलें आणि बगल देऊन बाहेर निघून गेलों.

पण ही युक्ति एकदांच अमलांत आणण्यासारखी होती. शिवाय ही युक्ति लीलेच्याही लक्षांत आली तेव्हां तिला बरोबर नेण्याखेरीज मार्ग नव्हता. दुसऱ्या दिवशीं सकाळीं आम्ही दोघे एका टांग्यांतून सराफाच्या दुकानीं गेलों. शेवटीं मी ज्या गोष्टीला भीत होतों ती गोष्ट घडून आलीच. दीडशें रुपये किमतीची एक नथ मी पसंत केली आणि लीलेनें पसंत केली त्या नथेची किंमत होती तीनशें रुपये! सराफाच्या देखत आमच्या मतभेदाचें प्रदर्शन न करतां मी युक्तीनें सराफाला ‘ नथ घ्याय-

चीच आहे. कोणची घ्यायची हें उद्यां कळवितों' असें सांगून लीलेसह बाहेर पडलों.

जेवण झालें. मी ऑफिसांत गेलों. पण डोक्यांत विचार हाच–कुठली नथ घ्यायची? मी ऑफिसांतून घरीं आलों. तिनें लगबगीनें चहा केला. रोज चहा कपांतून यायचा पण आज ट्रेमधून आला. तेव्हांच आज चर्चेला कुठला विषय निघणार याचा मी अंदाज बांधला. चहा घेत असतां तो विषय निघेल असें मला वाटत नव्हतें पण मी चहा घेत असतांच तो विषय निघाला.

चहा संपेतोंपर्यंत मी कांहींच बोललों नाहीं. चहा शांतपणें घेऊन झाल्यावर ट्रे एका बाजूला सारून कांहींतरी गंभीर विषयाची चर्चा करायची आहे, अशा बेतानें मी आसन ठोकलें आणि वकील कोर्टापुढें आपली बाजू जितक्या मुद्देसूद रीतीनें मांडतो तितक्या मुद्देसूद रीतीनें मी माझें म्हणणें पुढें मांडण्यास सुरवात केली. "तुला पसंत आहे त्या नथेची किमत तीनशें रुपये आहे हें तुला माहीत आहे. आज बँकेत आपली शिल्लक दोनशें चाळीस रुपये–व्याज वगैरेसुद्धां फारतर अडीचशें रुपये आहे. अशा स्थितींत तूं म्हणतेस ती नथ खरेदी करायची तर आज पन्नास रुपये तरी आपल्याला कर्ज काढावे लागतील. सराफानें आज अडीचशें रुपये घेऊन नथ आपल्या स्वाधीन केली तरी देखील त्याच्या वहीवर आपण पन्नास रुपयाचे कर्जदार म्हणूनच नमूद असणार. कुठल्याही स्वरूपांत कर्ज होऊं द्यावयाचें नाहीं असा माझा निश्चय आहे. आणि तो कालत्रयींही बदलणार नाहीं. तथापि तुझी इच्छाच असेल तर तूं आपल्या असलेल्या दागिन्यांपैकीं एकादा लहानसा दागिना मोडून पन्नास रुपयांची भरती केलीस आणि नथ खरेदी केलीस तर माझी कांहीं हरकत नाहीं." माझें बोलणें तिला रुचणार नाहीं, अशी माझी कल्पना होतीच. तथापि माझें बोलणें माझ्या अगदीं मनासारखें वठलें ह्याबद्दल मला फार आनंद झाला.

मी बोलायचा थांबतांच किंचित् अधीरपणानें तिनें सुरुवात केली. ‘ एकादा लहानसा दागिना मोडायचा आणि ती नथ घ्यायची ! छान ! असें कुठें झालें आहे का ? म्हणे लहानसा दागिना मोडायचा ! ’ जवळ जवळ मला वेडावीतच तिनें हे शब्द उच्चारले.

‘ ठीक आहे. लहानसा दागिना नको मोडूं. मग तुला हवी ती नथ मिळणेंही शक्य नाहीं. ’ विषय संपला अशा आविर्भावानें मी शेजारचें एक वर्तमानपत्र उचललें.

‘ आपण दागिना विक्रीला काढण्याची तोड सुचवलीत तशी मीहि एक तोड सुचवूं का ? ’

मी प्रश्नार्थक दृष्टीने तिच्याकडे पाहिलें.

‘ मी म्हणत्ये आज अडीचशे रुपये देऊन नथ आपण घ्यावी. पन्नास रुपये तो सराफ आपल्या नावावर काढील. ते आपण मागाहून देऊं. आपल्याला ते कांहीं अवघड नाहीं. ’

‘ ही कसली तोड ? असं झालं तरी आपण कर्जदारच होणार ना ? ही तोड नव्हे ! ही गोष्ट सर्वस्वीं माझ्या तत्त्वाविरुद्ध आहे आणि तत्त्वाला हरताळ फासायला मी मुळींच तयार नाहीं. आणखी दोनतीन महिन्यांनीं आपल्याजवळ जरूर असलेली शिल्लक जमा झाली कीं आपण ती खरेदी करून टाकूं. ’

‘ पण मी परवांच्या दिवशींच गांवीं जाणार आहे ना ? ’

‘ असेनास ! परत आल्यावर घेऊं. ’

‘ तें होईल, पण आज घ्यायला आपण तयार नाहीं ना ? ’

‘ मुळींच नाहीं. ’

‘ माझ्यासाठींसुद्धां नाहीं ? ’

‘ तुझ्यासाठींसुद्धां नाहीं. तुझा तरी एवढा हट्ट कां ? दोन महिन्याकरितां मला माझ्या तत्त्वाविरुद्ध जायला लावण्यांत तुला तरी काय मोठेंसें समाधान मिळणार आहे ? ’

'ठीक आहे.'

ती फणकाऱ्यानें निघून गेली. त्या वेळेपासून तिनें माझ्याशीं भाषण वर्ज्य केलें. माझा स्वभावही थोडा इर्षेखोरच असल्यानें त्यानंतर मीही आपणहून बोलणें काढलें नाहीं. तिसऱ्या दिवशीं लीला माहेरीं जावयास निघाली. जातांना 'गेल्यावर पत्र टाकायला विसरूं नकोस' असें मनांत असूनही मी बोललों नाहीं. आणि 'मधून मधून पत्र टाकायला विसरायचें नाहीं' असं लीलेला सांगायचं असूनही ती बोलली नाहीं.

लीला गांवीं गेल्यानंतर फिरून एकदां मी विद्यार्थ्यांच्या आयुष्यास आरंभ केला. एवढ्या थोरल्या घराची झाडलोट करायचा त्रास चुकावा म्हणून मी बाहेरच्या खोलींतच माझी कॉट, पुस्तकें, स्टोव्ह, ट्रंक, फोटो वगैरे सामान आणून टाकलें आणि मी विद्यार्थ्यांची खोली सजविली.

   

लीला माहेरीं जाऊन महिना होत आला तरी तिचं असें कांहींच पत्र आलें नव्हतें. मला वाटे, माहेरीं पोंचल्यानंतर पोंचल्याचें उत्तर घालणें तिचें कर्तव्य नव्हतें कां ? तिनें एक ओळ जरी खरडली असती तरी उत्तरादाखल मी सारें विसरून जाऊन दोन नोटपेपर भरतील एवढें लांबलचक पत्र लिहिलें असतें. पण तिचेंच पत्र नाहीं तर आपण तरी आपण होऊन पत्र घालण्याइतका उणेपणा का पत्करा ?—

पण मनाला मात्र सारखी रुखरुख लागलेली असे-झाली गोष्ट कांही बरी झाली नाहीं. पण लगेच मी विचारी-'यांत माझी काय चूक झाली ?' मी आतांपर्यंत जी हकीगत सांगितली यावरून कदाचित् तुम्ही मला दोष द्यालही. पण मला अजनही वाटतें कीं झाल्या प्रकारांत माझ्याकडे कांहींच चूक नव्हती.

मनाला लागलेली रुखरुख कांहीं अंशीं कमी करण्याकरितां व मन एका निराळ्याच विषयांत गुंतविण्याकरितां मी एक युक्ति योजिली. माझ्या

गतायुष्यांतला अत्यंत मनोहर असा काल मी जो कॉलेजांत घालविला तो काल किंवा त्या कालाचा आभास फिरून एकदां माझ्याभोंवतीं निर्माण करण्याचा मी उद्योग चालविला. मी कॉलेजांत असतांना वाचलेलीं पुस्तकें, घरांत कुठें तरी पडलीं होतीं तीं जमा करून मी माझ्या टेबला-वरच्या शेल्फवर व्यवस्थेनें ठेवून दिलीं. कॉलेजांत असतांना अलगूज वाजविण्याची कला मी पैदा केली होती. पण मला नोकरी लागली त्या-वेळेपासून त्या कलेकडे माझे दुर्लक्ष झालें होतें. मधून मधून एकाद्या वेळीं मजेखातर किंवा लीलेच्या आग्रहास्तव मी चार दोन पदें वाजवीत असे. पण असे प्रसंग एकंदरीनें अगदींच थोडे. तें अलगूज वाजविण्यांत मी सध्यां तास दोन तास घालवूं लागलों. संध्याकाळीं खानावळींत जेवण करून परत खोलींत आल्यानंतर मी तीं पुस्तकें किंवा तें अलगूज घेऊन बसत असे. त्यावेळीं माझ्या गतायुष्याचा सारा चित्रपट माझ्या नजरेसमोर उभा राही. तीं पुस्तकें वाचीत असतां वर्गांत प्रोफेसरांनीं कांहीं भागांचें स्पष्टीकरण कसें केलें, त्यावर विद्यार्थ्यांनीं कसे प्रश्न विचारले, आणि विद्यार्थ्यांच्या प्रश्नांना उत्तरें देत असता प्रोफेसरांनीं आपल्या कोट्या-विनोदानें सर्वांना कसें हंसवून सोडलें, एकदां वर्गांतल्या दोन विद्यार्थिनी उशिरा वर्गांत शिरल्या तेव्हां स्टँपिंग कसें झालें आणि एका कोपऱ्यांत माझ्या शेजारीं बसलेल्या एका व्रात्य विद्यार्थ्यानें ‘ वेलकम् ’ असें ओरडून त्यांचें स्वागत कसें केलें, असले अनेक लहानमोठें प्रसंग माझ्या दृष्टीसमोर उभे रहात. अलगूज वाजवीत असतां मला अनेक वेळां कशी ‘ वाहवा ’ मिळाली, माझ्या खोलीशेजारीं असणारा जोशी नांवाचा गानलुब्ध मित्र खोलींत येऊन एकदोन पदें वाजवून दाखवण्याबद्दल मला नेहमीं कसा आग्रह करीत असे, इत्यादि सारे प्रसंग आठवले म्हणजे प्रत्यक्ष नसले तरी कल्पनेनें मी त्या सृष्टींत वावरत आहे अशी माझी खात्री होई. गतायुष्य नव्यानें उत्पन्न करण्याचा माझा प्रयत्न अशा रीतीनें सफल झाल्यामुळें हळूहळू माझ्या मनांतली रुखरुख कमी होत गेली आणि त्या

महिन्याच्या शेवटीं माझ्याकडे कांहीं चूक नसतांना लीलेनें माझ्याबरोबर अबोला धरला आहे तर तिची चूक तिला कळून ती आपण होऊन माझ्याशीं बोलेपर्यंत मीही अबोला सोडणार नाहीं इतका निश्चय करण्या-इतका कणखरपणा माझ्या मनाच्या ठिकाणीं आला.

महिना होतांच आगाऊ ठरल्याप्रमाणें लीलेला धाडून देण्याबद्दल एक तीनचार ओळींचें पत्र मी तिच्या भावाला लिहलें आणि माझ्या पत्रा-प्रमाणें ती दोन दिवसानीं परत घरीं आली.

ती घरीं आली. घरांतला केरवारा निघाला. चुलींत विस्तव पडला. भांड्याकुंड्यांना व्यवस्था लागली. पण मी बाहेरच्या खोलीतलें माझें बिऱ्हाड हालविलें नाहीं. माझ्याप्रमाणें लीलेचाही कांहींतरी निश्चय झालेला असावा. एकदोनदा ती माझ्याशीं बोलली पण तें नाईलाजास्तव. आणि तेंही एकदोन शब्दांच्या आंतच. अशा शब्दांनीं आरंभिलेला अबोला संपुष्टात आला असें मानण्याइतका मी मुळींच दूधखुळा नव्हतों. लीलेला येऊन दोन आठवडे झाले. पण या दोन आठवड्यांत माझ्या वागण्यांत बाह्यात्कारी असा कांहींच फरक झाला नव्हता. आंत जाऊन दोन वेळा जेवण करावयाचें आणि दोन वेळा चहा घ्यावयाचा, ती सांगेल ते सामान घरखर्चासाठीं आणून द्यायचे, यापलीकडे कांहीं संबंध नाहीं, असा क्रम चालला होता. इंग्लंडांत कुटुंबांतून विद्यार्थी ठेऊन घेत नाहींत का, त्यापैकींच हा कांहींसा प्रकार होता.

माझ्या अंतर्यामीं मात्र मोठी खळबळ उडाली होती. लीला इथें नव्हती त्यावेळीं तिचें अस्तित्व विसरून जाऊन कल्पनेच्या जगांत वावरणें मला सोपें झालें पण आता ती रात्रंदिवस डोळ्यांपुढें असतांना तिला विसरून जाऊन कल्पनेच्या जगांत वावरणें मला जड जाऊं लागलें. वाळूवर बांधलेलें घर समुद्राची लाट येतांच कोलमडून पडतें त्याप्रमाणें माझें कल्पनेचें जग लीलेचें आगमन होतांच कोलमडून पडूं लागलें.

नेहमीं डोक्यांत हेच विचार—आम्ही एका घरांत राहणारीं दोन माणसें.

पतिपत्नीचा आमचा संबंध. असें असतांना आमचा संसार इतका कष्टप्रद कां व्हावा ? लीलेकडे चूक असेल पण टाळी कधीं एका हातानें वाजत नसते या न्यायानें माझ्याकडेही कांहीं चूक असेल काय ? आणि असे असेल तर ती चूक कोणती ? माझ्याकडे चूक असून मी लीलेला त्रास देण्याचा हा वेडेपणा करीत असेन तर मी तिचा केवढा अपराध करीत आहे ? पण तिच्याकडे चूक असून ती मला त्रास देत असेल तर ती माझा अपराध करीत नाहीं कां ? आमच्या चुका दाखवून देऊन आमची दिलजमाई कुणी करून देईल तर मी त्याचे उपकार जन्मभर विसरणार नाहीं. मला आई—बाबांची आठवण झाली आणि डोळयांत आसवें उभीं राहिलीं. विभक्त कुटुंब पद्धतीला मी मनांतल्या मनांत शिव्या देऊन घेतल्या. आम्ही आज एका मोठ्या एकत्र कुटुंबांत असतों तर हा प्रसंग आमच्यावर येताना, असें मला वाटूं लागलें.

दिवसेंदिवस माझें मन अशा रीतीनें लवचिक आणि नाजूक होत चाललें तसें कलहाचें हें शल्यही माझ्या मनांत जास्तजास्त खुपूं लागलें. पायाच्या तळव्यांत काटा मोडला तर जमिनीला घासून आपण पुढें चालूं लागतो पण डोळयासारख्या नाजुक भागांत एकादें बारीकसें कुसळ गेलें कीं डोळा खुपून आपण टिपें गाळूं लागतों. पंधरा दिवसापूर्वी लीला माहेरी असतांना लीलेशीं आपण होऊन न बोलण्याचा निश्चय करणारें माझें कणखर मन या पंधरा दिवसांत भारी हळुवार बनल्यामुळें मनांत खुपणाऱ्या शल्याचा मला फार त्रास होऊं लागला.

त्या नंतर एके दिवशीं रात्रीं नित्याप्रमाणें स्वयंपाकघरांत जेवण करून मी दिवाणखान्यांत पानसुपारी खात बसलों होतों. माझ्या पाठीमागें असलेल्या मोठ्या खिडकींतून चंद्रकिरण आंत बैठकीवर सांडल्यामुळें खोलींतल्या दिव्याच्या उजेडांत त्याची मोठी गंमत दिसत होती. माझें लक्ष सहज दिव्याजवळच्या एका नव्या फ्रेम केलेल्या तसबिरीकडे गेलें. पण ती केवळ तसबीरच नव्हती. जीगच्या वेलीवर बसलेल्या जीगच्या

दोन पोपटांनीं माझा एक बस्ट फोटो आपल्या चोचींत उचलून धरला होता. तो फोठो मला चटकन् ओळखला. माझ्या वाढदिवसाच्या निमित्तानें हाच फोटो मी लीलेला भेट म्हणून दिलेला होता. तसबिरीच्या एका कोपऱ्यांत ' सौ. लीला पुरंदरे ' हीं अक्षरें हिरव्या रेशमांत विणली होती. ती तसबीर पाहतांच माझ्या मनांत एकदम लख्ख प्रकाश पडल्यासारखें झालें. ' लीले, माझ्याप्रमाणें मनांतली रुखरुख विसरून जाण्यासाठीं माहेरीं असतांना तूं हें साधन शोधून काढलेस ना ? ठीक ! ठीक ! पण एकमेकांची आणि स्वतःचीही अशी फसवणूक आम्ही कां बरें करून घ्यावी ?... '

विचाराच्या भरांत मी तिथून उठून माझ्या खोलीकडे आलों. मी खोलीचें कुलूप काढलें. बागेकडच्या खिडकींतून चंद्रकिरण माझ्या आरामखुर्चीवर पडले होते. दिवा लावू नये असें मला वाटलें. त्या चंद्रकिरणांत मी खुर्चीवर बसलों. बाजूच्या स्टुलावर मी एकाकाळीं कॉलेजांत वाचललें आणि सध्या फिरून वाचायला घेतलेलें हॅम्लेट नाटक व माझें आवडतें अलगूज ठेवलें होतें. असे विषण्ण विचार मनांत आले कीं मी हटकून ते अलगूज वाजवावयाला घेतलेंच. नथेच्या बाबतींत माझा आणि लीलेचा खटका उडण्यापूर्वी असे विषण्ण विचार मनांत येण्याचे प्रसंगही थोडे होते आणि त्या मानानें मी हटकून माझ्या अलगुजाचा आश्रय करण्याचे प्रसंगही थोडेच होते. पण त्या वेळेपासून तें अलगूज माझ्या रोजच्या कार्यक्रमाचें एक विशिष्ट अंग होऊन बसलें होतें.

मी तें अलगूज उचललें आणि वाजवावयाला सुरवात केली. पहिलें पद मी वाजवलें ते सहजगत्या बाई सुंदराबाईचें ग्रामोफोनवरचें एक रेकॉर्ड होतें. ती लावणी वाजवीत असतां माझ्या गतायुष्यांतला एक गोड प्रसंग चटकन् माझ्या डोळ्यासमोर उभा राहिला. मी त्या वर्षी सीनिअर बी. ए. च्या वर्गांत होतों. त्या ब्लॉकमध्यें सारे सीनिअरचे आणि इंटरचेच विद्यार्थी असत. परीक्षा पंधरा दिवसांवर आल्या होत्या. रात्रीच्या वेळीं

दिवा ढणढण जाळून विद्यार्थी अभ्यासांत निमग्न झालेले असत. टॉवर क्लॉकचे बाराचे ठोके पडले कीं मी माझें अभ्यासाचें पुस्तक बाजूस सारीत असे. तें अलगूज घेत असें आणि बाई सुंदराबाईची हीच लावणी अल-गुजावर वाजवीत मी व्हरांड्यांतून इकडे तिकडे फिरत असे. एकदां चांदणें असेंच शुभ्र पडलें होतें. नेहमींप्रमाणें बाराचा ठोका पडतांच मी माझें अलगुज घेऊन व्हरांड्यांत आलों. पण वाटलें आज अलगूज वाज-वून मनाला हुरारी आणण्याची काय जरुरी? चांदणें कसें छान पडलें आहे! व्हरांड्यांतून एक शतपावली काढूं आणि परत खोलींत जाऊं. माझ्या विचाराप्रमाणें मी परत खोलींत येऊन बसलों न बसलों तोंच माझ्या शेजारच्या खोलींतला माझा गानलुब्ध मित्र जोशी माझ्या खोलींच्या दारावर टिचकी देऊं लागला. मी दार उघडलें. तो आंत आला.

‘ वा! पुरंदरे, बारा तर केव्हांच वाजून गेले! आणि अजून आपली गोड गस्त नाहीं फिरली कुठें?’

‘ गोड गस्त? छान! एकूण मी गस्तीचा शिपाई तर!’

‘ मग त्यांत तुला अपमान वाटला कीं काय? वेड्या, ही गोड गस्त मला घालतां आली असती तर स्वतःला मी मोठा भाग्यवान् समजलों असतों.’

त्याच्या आग्रहावरून शेवटीं मला ती गोड गस्त घालावीच लागली.

पण आज—जोशी कुठें असेल? मीं रहात होतों त्या खोलींत कोण रहात असेल? माझ्या आयुष्यांतला तो काल मला फिरून दिसणार नाहींना?

मन इतकें बावरून गेलें कीं आतां खोलींत अलगूज वाजवीत बसणें शक्यच नव्हतें. मी बाहेर बागेंत गेलों. बागेचा माझ्या इतकाच लीलेला नाद असे. परवा माहेराहून परत येतांना तिनें दोन जाईच्या वेली आणल्या होत्या. आणि त्या बागेंत लागू झाल्या तसा तिचा आनंद पोटांत मावेनासा झाला होता. माझे पाय नकळत त्या जाईच्या वेलीकडे वळले. मी कवि नव्हतों पण माझें हृदय कवीचें आहे असें

निदान त्या वेळीं तरी मला वाटलें. माझ्या हृदयांतली विषण्णता कवितेंत प्रगट करण्याइतकी प्रतिभा माझ्या ठिकाणीं नव्हती तरी एका कवीनें लिहिलेल्या विषण्ण ओळी आठवण्याइतकी स्मरणशक्ती माझ्या ठिकाणीं खास होती. त्या ओळी मला एकदम आठवल्या व मी त्या माझ्याशीं गुणगुणूं लागलों.

‘ सुंदर सगळें, मोहक सगळें । खिन्नपणा परि मनिंचा न गळे, ॥
नुसती हुरहुर होय जिवाला ।– कां न कळे कांहीं ?
चंद्रबिंब धरी अभिनव कांती । मेघ तयांनीं धवलित होती ।
परि हृदयीं नैराश्यकालिमा । मम खंडत नाहीं ! ’

माझ्या मनाची अत्यंत हळुवार अवस्था झाली होती. कलह, मान, अपमान, या साऱ्या जागतिक गोष्टींच्या पलीकडे मनाची जी एक अवस्था असते आणि ज्या अवस्थेंत आपण कुठल्या तरी उच्च वातावरणांत वावरत आहोंत, जग आपल्यावर प्रीती करीत आहे आणि आपण जगावर प्रीती करीत आहोंत अशी आपली भावना असते ती अवस्था आतां माझ्या मनाला प्राप्त झाली होती. आजपर्यंत खोट्या मानापमानाच्या भरीं पडून आपण ज्या प्रेमाला आंचवलों, आणि जीं कांहीं संकटें आपण निष्कारण आपल्या मार्गांत निर्माण केलीं त्या साऱ्या संकटांचा नायनाट करून पुन्हा प्रेमाचें राज्य घरांत सुरू करण्याचा मी विचार केला.

मी परत खोलींत आलों. लीलेच्या आवडीचीं पदें मला ठाऊक होतीं. तीं पदें मी वाजवायला सुरवात करताच नागीण जशी पुंगींतून निघणाऱ्या आवाजाच्या अनुरोधानें जवळ जवळ येऊं लागते त्याप्रमाणें लीला माझ्या खोलीशीं घोटाळूं लागेल असा माझा कयास होता. कलहाचें हें पिशाच्च जिवंत ठेवण्यांत लीलेलाही यातना होतात या गोष्टींचें अगदीं ताजें प्रत्यंतर मला त्या जीगच्या पोपटांनीं आणून दिलेंच होतें.

मी तीं पदें वाजवूं लागलों. गेल्या महिन्यांत वाजविण्याचा चांगला

सराव झाल्यानें आणि विशेषतः माझें सारें अंतःकरण ओतून मी स्वर काढीत असल्यानें पदें इतकीं उत्तम वाजविलीं जात होतीं, मींड, ताना, खटके, मुरक्या, इतक्या रेखीव वठत होत्या, कीं माझें मलाच आश्चर्य वाटलें.

सुमारें पंधरा वीस मिनिटें झाली असतील. माझ्या कयासाप्रमाणें लीला आली पण खरें कारण दडविण्याच्या उद्देशानें ती ह्मणते—

'इथें खोलींत कुठें स्टोव्ह होता का ?'

'तुमचा स्टोव्ह काय झाला ?'

'घरांतला स्टोव्ह नादुरुस्त आहे.'

घरांतला स्टोव्ह नादुरस्त नव्हता हें मला पक्कें माहीत होतें. मी चटकन् आरामखुर्चीवरून उठलों. आणि दुसऱ्या एका खुर्चीकडे बोट दाखवीत मी म्हणालों.

'लीले, अशी या खुर्चीवर बैस.'

ती खुर्ची मी अनेकदां माझ्या प्रेमळ स्नेह्यांना बसण्यासाठीं पुढें केली होती आणि या वेळींही त्याच ऐटीनें मी ती खुर्ची तिच्यापुढें केली.

प्रत्यक्ष नांवानें मारलेली हांक, आणि पुढें केलेली खुर्ची या गोष्टीमुळें ती थोडी गोंधळली असावी. पण अशा गोष्टीचा विचार करायला सध्यां मला वेळच नव्हता. 'एका महत्त्वाच्या गोष्टींत तुझ्याशीं मला बोलायचें आहे. दिवा लावतों तोंपर्यंत थांबशील ना ?' मी म्हणालों.

मी स्टँड लावून टेबलावर ठेवला आणि आरामखुर्चीवर बसलों. 'तूं आपण होऊन प्रथम माझ्या खोलींत आलीस तेव्हां मी आपण होऊन प्रथम तुझ्याबरोबर बोलण्यास सुरुवात केली. तेव्हां पड खाल्याबद्दल कुणालाही वाईट वाटून घ्यायला नको. खरें ना ?

ती अजूनही नेहमींच्या मनःस्थितींत आली नसावी. तथापि तिनें उत्तरादाखल मान हालविली.

'मी तुला नांवानें हांक मारली आणि तुझ्याकरतां खुर्ची पुढें केली तेव्हां

तूं गोंधळलीस काय ?—पण त्यांत तुलाही दोष देण्यांत अर्थ नाहीं. आजपर्यंत माझी आणि आम्हा पुरुषवर्गाची एक चूक होत आली आहे. संसारांतल्या आमच्या बरोबरीच्या भागीदारांना आम्ही वागवावें तसें वागविलें नाहीं. त्यांना पैशाचें मोल कळण्याची आम्ही कधीं संधीच दिली नाहीं. मी तुझ्या हौसेचे मोल केलें नाहीं म्हणून तूं माझ्यावर रागावलीस पण तुला त्या हौसेपायीं खर्च होणाऱ्या पैशाचें मोल कळतें तर तूं ती भीड केव्हांही घातली नसतीस अशी माझी खात्री आहे.'

मी एका महत्त्वाच्या मुद्यांचे स्पष्टीकरण करीत असल्यानें ती सावरून बसली.

"बापाच्या घरांत मुलींना बाहुल्याप्रमाणें वाढविण्यात येते आणि नवऱ्याच्या घरांतहि त्याना बाहुल्याप्रमाणेंच सांभाळण्यांत येते. बाजारासाठीं त्याच्या हवालीं करण्यांत आलेला पैसा काहीं जिनसा खरेदी करण्यांत खर्च होऊन गेल्यानंतर दुसऱ्या काहीं जिनसा खरेदी करायला त्याच्याजवळ पैसा रहात नाहीं आणि त्यांना पैशाची टंचाई भासते. पण ही टंचाई आणि प्रपंचाचा गाडा चालवीत असतां भासणारी टंचाई यात जमीनअस्मानाची तफावत आहे. इतकी कीं कोवळ्या उन्हांतली उष्णता आणि धगधगीत निखाऱ्याची उष्णता यांच्यांतही तेवढी तफावत नसेल ! संसाराचा गाडा चालविण्याची संधी एरवी स्त्रियांना मिळत नसल्यानें संसारांत पैशाचें मोल काय असतें हें कळण्याची संधीही त्याना मिळत नाहीं हें खरें ना ?"

माझ्या विचारांवर लीलेचाही विचार चालला होता. तिचा होकार येण्यापूर्वी मला बराच वेळ खोळंबून बसावें लागलें.

"तेव्हां मी एक प्रयोग करून पहायचे ठरविलें आहे. महिन्याच्या काठीं माझ्या खासगी खर्चासाठीं मी फक्त पांच रुपये ठेऊन बाकीची सारी रक्कम मी तुझ्या हवालीं करणार आहे. त्या रकमेपैकीं दरमहा वीस रुपये बँकेकडे जाऊं देत अशी माझी फक्त सूचना आहे. ती तूं अमलांत आण अगर न आण. रकमेचा विनियोग कसा होतो हें

देखील मी पाहणार नाहीं. प्रयोगाची मुदत सहा महिने आहे. त्यानंतर हिशेब पाहून प्रयोग यशस्वी होतो असें आपणा उभयतांना आढळून आलें तर ही व्यवस्था आणखी कांहीं दिवस अशीच पुढें चालवूं."

यानंतर आमचें बराच वेळ संभाषण चाललें होतें पण प्रस्तुत गोष्टीच्या दृष्टीनें त्याचें महत्व नसल्यानें मी तें सांगून वेळ घालवीत नाहीं. मात्र त्या संभाषणांत कर्ज न होऊं देण्याला मी इतका का जपतो हें मी तिला युक्तीनें पटवून दिलें. एका रशियन ग्रंथकारानें आपल्या एका गोष्टींत एक मजेदार अनुभव सांगितला आहे. तो म्हणतो. 'उबाऱ्याचा आणि सुग्रास भोजनाचा खरा आनंद अनुभवावयाचा असेल तर तत्पूर्वी बर्फाच्या वादळात जाऊन येण्याचे कष्ट सोसले पाहिजेत.' या उक्तींतच थोडा फरक करून मी तुम्हाला असा आग्रह करीन कीं 'जिव्हाळ्याच्या संभाषणाचा खरा आनंद अनुभवावयाचा असेल तर तत्पूर्वी अबोल्याचे कष्ट महिना दीड महिना तरी सोसले पाहिजेत–!'

आमच्या घरांत फिरून आनंदी वातावरण निर्माण झालें. गेल्या कटु अनुभवानें आम्ही कितीतरी शहाणे झालों होतों. परस्पराच्या सुखदुःखाची आधी काळजी करावयाची हें तत्त्व आम्हाला आतां कळलें होतें आणि सुखी संसाराचें हेंच आद्य तत्त्व नाहीं का ?

त्यानंतर चार दिवसांची गोष्ट. त्या चार दिवसांत एवढ्या कलहाचें आणि त्रासाचें जें मूळ त्या नथेचा उल्लेख आमच्या भाषणांत कधींच आला नाहीं. जणू कांहीं तो प्रसंग आमच्या आयुष्यांत घडून आलाच नव्हता !–

पाचव्या दिवशीं ऑफिस सुटल्यावर मी थोडा उशिराच घरीं आलों. लीलेनें नेहमींच्या वेळीं चहा तयार करून ठेवला होता. मी येतांच लग-बगीनें तिनें चहा एका ट्रेमध्यें मांडून स्टुलावर ठेवला. आराम खुर्चीवर बसून मी चहा घेऊं लागलों.

## कल्पना-विकास

'आज इतका वेळ कां लागला कचेरींतून यायला?' लीलेनें विचारलें.

चहाचा रिकामा ट्रे बाजूला सारीत 'हें पहा तें कारण' असें म्हणून मी कोटाच्या आंतल्या खिशांतून हळूंच एक तांबडी पुडी बाहेर काढली.

'हें काय?' तिनें अधीरपणें विचारलें.

'हा आमचा नव्या फडणिसांकरितां आम्ही आणलेला नजराणा' असें बोलत असतां तिनें पसंत केलेली तीनशें रुपये किंमतीची ती नथ मीं पुढें केली.

'स्त्री' जुलै १९३४.

---

# हिरवी ज्योत : २

जन्ममरणाच्या फेऱ्यांतून मुक्त होण्याची कल्पना जितकी सनातन आहे तितकीच मोहक आहे. जन्माला आल्यापासून प्रपंचांतला जंजाळ मागें लागतो तो कायमचा नाहींसा होईल तर किती छान होईल! याच कल्पनेनें भारलेला मुमुक्षु एका थोर साधुपुरुषाकडे आला आणि त्या साधूजवळ त्यानें आपले मनोगत निवेदन केलें.

साधुपुरुषानें त्या मुमुक्षूस एकदोन दिवस आपल्याजवळ ठेवून घेतलें आणि त्यानंतर योगमार्गांतलें एक विशिष्ट आसन त्यास सांगून त्या आसनाचा एकांतांत सतत अभ्यास करीत गेल्यास डोळ्यांपुढें एक हिरवी ज्योत

दिसूं लागेल आणि अभ्यास तसाच पुढें चालविल्यास वर्ष सव्वा वर्षाच्या आंत त्या हिरव्या ज्योतींतूनच ॐकाररूप मंत्र आपोआप प्रगट होईल आणि त्या मंत्राच्या जपानें मुक्ति मिळेल असें सांगितलें.

साधुपुरुषाची अशी सल्ला मिळतांच त्या मुमुक्षु शिष्याला विलक्षण आनंद झाला. मोक्ष त्याला हातचा मळ वाटूं लागला. आणि पुढें थोड्या दिवसांनीं त्या साधुपुरुषाची आज्ञा होतांच त्याचा निरोप घेऊन तो शिष्य परत आपल्या गांवीं आला आणि त्यानें तें योगासन नित्य नेमानें अभ्यासण्याचा अखंड क्रम चालू ठेविला.

चार महिन्यांनंतर शिष्याचें गुरुजींना पत्र आलें—" हिरवी ज्योत अजून डोळ्यांपुढें येत नाहीं. फक्त अलीकडे ती येत असल्याचा भास मात्र होतो. "

गुरुजींचें उत्तर गेलें. " लक्षण चांगलें आहे. असाच अभ्यास पुढें चालवावा."

आणखी चार महिने गेले. त्यानंतर फिरून एकदां शिष्यानें पत्र लिहिलें—" हिरवी ज्योत अलीकडे बरीचशी स्पष्ट दिसूं लागली आहे ; पण अजून कांहीं प्रगट झालेली नाहीं. ती ज्योत प्रगट होऊन ॐकाररूप मंत्र केव्हां प्रगट होणार हें कांहीं कळत नाहीं."

गुरुजींनीं लिहिलें " असें अधीर होऊं नये. योगाभ्यास फार त्रासदायक असतो. असाच अभ्यास पुढें चालवावा. सिद्धि मिळाल्याशिवाय राहणार नाहीं."

गुरुजींचें पत्र पोहोंचतांच शिष्याला अंमळ धीर आला. पुन्हा त्याचा नित्यक्रम सुरू झाला. अशा स्थितींत आणखी चार महिने गेले. गुरुजींनीं सांगितलेलें योगासन चालू ठेवल्यास वर्ष झालें. वास्तविक गुरुजींनीं सांगितल्याप्रमाणें एव्हांना हिरवी ज्योत प्रगट होऊन तींतून ॐकाररूप मंत्र प्रगट व्हावयास हवा होता; पण वर्ष झालें तरी ती ज्योत प्रगट होण्याचें मुळींच लक्षण दिसेना.

शिष्याला राग आला. गुरुजी आपली वंचना करीत असावेत अशी त्याला शंका आली. पण त्या शंकेस थारा देण्यास मात्र त्याचें मन धजावेना. तथापि एकदां गुरुजीकडे जाऊन या प्रकरणाचा योग्य तो खुलासा करून घेण्याचा निश्चय करून त्यानें आपलें गांव सोडलें.

तो गुरुजीकडे आला. त्यावेळीं संध्याकाळ झाली होती. आश्रमांत भजनी मंडळीचें भजन चाललें होतें. आणि भजन संपतांच देवाची आरती व्हावयाची होती. गुरुजी तिथें एका आसनावर नित्यक्रमाप्रमाणें बसले होते. आपल्या मनांतली शंका गुरुजींना विचारण्याची ही वेळ नव्हे, उद्या सकाळपर्यंत आपल्याला थांबलें पाहिजे, असा विचार करून तो शिष्य त्या भजनी मंडळींत सामील झाला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं गुरुजी स्नान करून पूजेस बसणार तोंच हा शिष्य पुढें झाला आणि अभिवादन करून त्यानें आपली शंका पुढें मांडली.

"हिरवी ज्योत डोळ्यांपुढें येत असल्याचा भास होतो, हिरवी ज्योत अलीकडे बरीचशी स्पष्ट दिसूं लागली आहे, अशा अर्थाचे उल्लेख तुझ्या पत्रांतून वाचल्याचें मला स्मरतें. या अनुक्रमानें पाहिल्यास ती ज्योत लौकरच प्रगट होईल. असें असतां तूं इथें येण्याची घाई कां केलीस?" गुरुजींनीं विचारलें.

'हिरवी ज्योत दिसते पण.. ...' बिचारा शिष्य गोंधळून गेला. पुढें काय बोलावें हें त्याला कळेना.

'पण काय? काय खरं आहे तें सांग.' गुरुजींनीं आज्ञा केली.

'हिरवी ज्योत दिसते पण . ....' मघांच्याच शब्दाचा त्या शिष्यानें पुन्हां एकवार उच्चार केला.

'तूं खोटें बोलत आहेस. खरं सांग. हिरवी ज्योत तुला दिसते?' शिष्याच्या गोंधळलेल्या चेहऱ्याकडे रोखून पहात गुरुजींनीं विचारलें.

'हिरवी ज्योत मला दिसत नाहीं, स्वामी.'

' हिरवी ज्योत दिसत नव्हती तर पत्रांत तसं का लिहीत होतास ?'

शिष्याकडून कांहींच उत्तर आलें नाहीं.

" मी सांगितलं आणि तूं माझ्या शब्दांवर खुशाल डोळे मिटून विश्वास ठेवलास आणि आपला खरा अनुभव पत्रांत न लिहितां प्रतारणा करण्यास आरंभ केलास, असंच ना ? "

गुरुजींचें म्हणणें सत्य होतें.

" एका वर्षाच्या दीर्घ कालावधीनंतर कां होईना; पण माझ्या शब्दांतही असत्य असूं शकेल ही शंका तुला आली म्हणायची ! ठीक झालं. स्वतःची बुद्धि, तर्क, अनुभव, प्रामाणिक मत, बाजूला ठेवून दुसऱ्याच्या—प्रत्यक्ष गुरुजींच्याही शब्दांवर जो डोळे मिटून विश्वास ठेवितो असा शिष्य कुठलीही विद्या ग्रहण करण्यास अयोग्य असतो. तूं आतां स्वतःच्या बुद्धीचा उपयोग करूं लागलास. तुझी योग्यता आतां सिद्ध झाली आहे. आतां तुला खराखुरा उपदेश द्यायला कांहींच हरकत नाहीं. "

गर्हिवरून आलेल्या शिष्यानें गुरुजींच्या पायांवर मस्तक ठेविलें. गुरुजींनींही आपला वरदहस्त त्याच्या मस्तकीं ठेविला.

' मनोहर ' दिवाळी अंक नोव्हेंबर सन १९३४.

---

## निसर्ग आणि मानव : ३

मी जिन्याच्या एक दोन पायऱ्या चढलों असेन नसेन—तोंच वरून गोड आवाजांत गायिलेल्या एका गीताच्या ओळी माझ्या कानांवर आल्या—

घरटीं तीं फांद्यांमधुनी झुलती,
निजले चिउकाऊ, निजवीती
झुळका गाउनि गीती, गाणीं किती गाऊं ?

—मी जिन्यांतच थबकलों. आज किती तरी दिवसांनीं कलेच्या तोंडून बाहेर पडणाऱ्या त्या ओळी माझ्या कानांवर येत होत्या. मी वर गेलों असतों तर तिनें आपलें गाणें अर्धवट सोडलें असतें, अन् माझ्या-

करतां— ऑफिसांतून दमूनभागून आलेल्या आपल्या नवऱ्याकरतां—ती चहा करण्याच्या उद्योगाला लागली असती. चहाची त्या वेळीं मला जरूर होतीहि. पण मीं विचार केला—चहा काय रोजचाच आहे, गाणं काय रोज ऐकायला मिळतें ? त्यांतून बाळ गेल्यापासून कलेच्या साऱ्याच वृत्ति इतक्या कोमेजल्या होत्या कीं, मी आग्रह करून देखील तिनें गाण्याची एक ओळहि गाऊन दाखविली नसती. त्यापेक्षां ती आपण होऊन जर गात आहे तर ती संधि कां दवडा ?....

पुढची ओळ कानांवर येऊं लागली—

हम्मा ही, दूदू देउनि पाहीं, निजली गोठ्यांत,—

—सहा महिन्यांपूर्वींचा एक प्रसंग जशाचा तसा माझ्या मनःचक्षूं-समोर उभा राहिला.

रात्रींचे आठ वाजण्याचा सुमार असेल. मी क्लबांतून घरीं परत येऊन जिन्यांतून वर चढणार, तोंच हेंच गीत माझ्या कानावर आलें. मी असाच थोडा वेळ जिन्यांत थबकलों. मग पाऊल न वाजवतां हळूच वर गेलों. माझी चाहूल कलेला लागली नव्हती. तिनें बाळाला पाळण्यांत घातलें होतें. त्याला झोके देत आणि ह्याच ओळी गात त्याला निजविण्याचा कलेचा प्रयत्न चाललेला होता. मी तिच्या अगदीं जवळ जाऊन उभा राहिलों अन् म्हणालों—

‘ कशाला त्याला निजवण्याचा प्रयत्न करीत आहेस ? अशानं का तो निजणार आहे ? ’

कला आपल्या नादांत एवढी मग्न झालेली होती कीं माझे शब्द तिच्या कानांवर पडतांच ती एकदम दचकली आणि म्हणाली—

‘ इश्श ! हें काय ? अन् केव्हां आलांत ?—माझं लक्षच नव्हतं मेलं.’

‘ आलों केव्हां तरी—पण तें जाऊं द्या. त्याला निजवण्याचा तूं प्रयत्न करूं नको. अशानं तो कधींहि निजणार नाहीं. ’

‘ अशानं म्हणजे कशानं ? कां निजणार नाहीं तो ? ’

' वेडे, इतकं गोड गाणं ऐकत रहायचं सोडून कुणी झोपेल का? मी जर त्याच्या जागीं असतों तर कध्धीं झोपलों नसतों!'

' इश्श! कांहीं तरीच!—पाहिलंत? गुलाम अजून जागा आहे!–'

त्यानंतरचें तें मृदु हास्य आणि एकदम सैंपाकघरांत पळून जाणं...

—जिन्यांत उभा होतों तेव्हां क्षणाभरांत तो सारा प्रसंग माझ्या नजरेसमोर उभा राहिला. क्षणाभरांत अंगावर कांटे उभे राहिले आणि दुसऱ्या क्षणीं डोळे ओले झाले.

—न होतील तर काय होईल? जगाच्या दृष्टीनें एक जीव आमच्या घरीं आला, सहा महिने राहिला अन् निघून गेला! पण आमच्या दृष्टीनं...

—कसली दृष्टि! डोळे फिरायचीच वेळ आली होती.

—दुसऱ्या क्षणीं पुढील ओळ कानांवर येऊं लागली.

' रे छब्रिल्या, राघू मैना निजल्या, अपुल्या पिंजऱ्यांत— '

शेवटचीं अक्षरें अस्पष्टपणानेंच कानांवर आलीं आणि त्यानंतर एक हुंदकाहि—

मला जिन्यांत उभे राहवलें नाहीं. मी झटकन् वर आलों. लोखंडी पलंगाच्या वळकटीवर कलेनें आपलें अंग टाकलेलें होतें. दोन्ही हातांच्या पंजांनीं तिनें आपलें मुख झांकून घेण्याचा प्रयत्न केला होता, पण डोळ्यातून वाहणाऱ्या अश्रुधारा स्पष्ट दिसत होत्या.

' कले, वेडे हें काय? विचार करायचाच सोडून दिलास का? आज दोन महिने झाले त्या गोष्टीला; अन् अजून तुझं रडूं थांबत नाहीं?'

' नाहीं थांबत!' तिनें निराशेनें आणि निर्वाणीनें उत्तर दिलें.

' मग रडत बैस तर!' मी किंचित् वैतागानें उद्गारलों आणि खिडकीजवळच्या आरामखुर्चीवर देह टाकून देऊन खिडकींतून बाहेर पाहूं लागलों.

माझ्या शब्दांपेक्षां माझ्यावरील तिच्या अंतःकरणांत असलेल्या प्रीती-

चाच जास्त परिणाम झाला असावा. मी ऑफिसांतून दमून आलों होतों, मला चहाची जरूर होती, या गोष्टी तिच्या लक्षांत आल्या असाव्यात. तिनें डोळे पुसले आणि ती सैंपाकघराकडे गेली.

तिच्या हालचाली माझ्या लक्षांत येत होत्या. पण मी मुद्दामच तिच्याकडे पहात नव्हतों. 'माझ्या शब्दांना तूं कांहींच किंमत देत नाहींस का?' असाच सवाल जणुं कांहीं मला माझ्या कृतीनें सूचित करावयाचा होता.

पण खिडकींतून बाहेर पहात राहण्यास दुसरेंहि एक कारण घडलें. खिडकींतून जवळच एका जुन्या घराचें एक छप्पर दिसत होतें; आणि त्या छपराच्या खालीं भिंतींत असलेल्या एका बिळांत चिमण्याच्या एका जोडीनें आपलें घरटें केलेलें होतें. घरट्यांतील पिलांचीं आईबापें आपल्या चिमुकल्या चोंचींतून चारा आणून तो त्या पिलांना भरवीत होतीं. घरट्याच्या दाराशीं तीं आलीं कीं आंतील पिलांची जी चिंवचींव चाले ती माझ्या खिडकींतून अस्पष्ट ऐकूं येई. पक्ष्यांमधील हें वात्सल्य पाहून माझें पोळलेलें अंतःकरण गहिवरून आलें. नकळत कवि यशवंताच्या ओळी माझ्या जिभेवर नाचूं लागल्या—

'चारा मुखीं पिलांच्या चिमणीं हळूंच देई  
गोठ्यांत वासरांना त्या चाटतात गाई  
वात्सल्य हें पशूंचें मी रोज रोज पाही—'

'चहा घ्यायचा होता ना?'—कला. 'थांब थोडी.' त्या घरट्यावरून दृष्टी न वळवितां मीं कलेच्या प्रश्नाला उत्तर दिलें.

'काय पहायचं तिथं एवढं? तें घरटं ना? इकडून यायच्यापूर्वी मीहि तेंच पहात होत्यें. अन् तें पाहतांच बाळाची आठवण झाली, भडभडून आलं नी रडूं आवरेना...'

मी आलों त्या वेळीं एवढा उत्पात कां घडून आला याचें कारण जें तिनें सांगितलें तें मला लागलीच पटलें. आणि तें पटतांच तिच्याशीं मीं केलेली कठोर वागणूक माझ्या मनांत बोंचूं लागली.

'मग असं अगोदर कां नाहीं सांगितलंस? मी तुझ्याशीं केवढ्या कठोरपणानं वागलों! तुम्हां बायकांचा फाजील सहनशील स्वभाव–'

'चहा निवून चाललाय तो घ्यायचा.'

त्या प्रसंगानंतर थोडे दिवस लोटले.

थोडे दिवस, पण युगांसारखें वाटत होते मला! जीवनांत कुठल्याहि प्रकारचा आनंद नव्हता. कारण जीवनांतील जोडीदारीणच नेहमीं खिन्न असे. तिच्या कट्टर असहकारितेमुळें संसारांत आनंद निर्माण करण्याचे माझे सारे प्रयत्न फुकट जात.

संसार म्हणजे एक जुगार वाटूं लागला मला. जुगारांत पैसे लावावेत. एखादी मोठी रक्कम मिळावी. त्यानंतर मोठ्या रकमेच्या आशेनें फिरून पैसे लावावेत. पण ते निघून जावेत. अशा परिस्थितींत त्या जुगाऱ्याला स्वतःचा, जुगाराचा, फार काय जगाचाही राग येतो, तिरस्कार वाटूं लागतो; पण आशेचा मोह सोडवत नाहीं. तो जुगारी फिरून पैसे लावतो आणि फिरून ते गमावतो. विवाहानंतर कांहीं काळ संसाराचें सुख आम्हांला मिळालें. आमच्या घरांत बाळाच्या रूपानें संसारसुख प्रत्यक्ष अवतरलें. पण पुढें त्याच्या मृत्यूनंतर आमचें संसारसुख लयाला गेलें आणि तें लुप्त सुख परत मिळावें म्हणून मीं केलेल्या प्रयत्नांना कांहींच यश येईना.

मीं तिच्यावर रागावें; कधीं कधीं समजुतीच्याहि गोष्टी सांगें. मी समजूतदारपणानें बोलूं लागलों कीं तिनें निराशेच्या स्वरांत म्हणावें— 'आशेचं–वेलीचं मूळच जर वाळलं आहे तर किती पाणी घालून नी आणखी काय करून तरी काय होणार?'

'पण वेलीचं मूळ तर कायमचंच वाळलं नाहीं ना?' मीं म्हणावें, "अजून त्यांत जिवंतपणा आहे ना? मग वेल केव्हां मूळ धरणार?–वेडे, गेल्या गोष्टीचा शोक किती करावा, याला तरी मर्यादा आहे कीं नाहीं? गेल्या गोष्टींचा फारसा शोक करावयाचा नाहीं, असा नियम निसर्गानं

सतत नजरेसमोर ठेवलेला आहे म्हणून तर जग चाललेलं आहे. झाडाच्या फांद्या तोडल्या तरी नवीन फुटतात, उन्हाळ्यांत नदी आटली तरी ती पावसाळ्यांत फिरून भरून वाहूं लागते; अमावास्या झाली कीं दोनच दिवसांनीं बिजेची कोर दिसूं लागते. गेल्या गोष्टींबद्दल निसर्ग कधीं शोक करीत बसला आहे ? मग मनुष्यांनींच तेवढा शोक कां करावा ? मायामोह सुटत नाहीं, हें मलाहि कबूल आहे. बाळाच्या मरण्यानं तुलाच तेवढं वाईट वाटलं—अन् मला वाटलं नाहीं, अशी का तुझी समजूत आहे ? माझं म्हणणं एवढंच कीं शोकालाहि मर्यादा असावी. अति झाल्यास..."

'तुमचं म्हणणं नी मोठमोठे विचार माझ्या डोक्यांत शिरत नाहींत—त्याला मी तरी काय करूं ?'

कलेचें हें उत्तर ऐकलें कीं माझें मस्तक बधिर होऊन जात असें.

माझ्यापुढचा पेंचप्रसंग खरोखरीच अतिशय चमत्कारिक होता.

तिला कठोर शब्द बोलून तिच्या पोळलेल्या मनाला जास्तच त्रास द्यावा हें मला बरें वाटत नव्हतें. माझा युक्तिवाद ती समजावून घेण्यास तयार नव्हती. तिच्या सहकार्याशिवाय आमच्या संसारांत जिवंतपणा येण्यासारखा नव्हता.

या चमत्कारिक पेंचप्रसंगांतून सुटावें कसें याचा विचार करीत मी त्या खिडकीजवळ असलेल्या आरामखुर्चीवर पडून खिडकीबाहेर तासचे तास पहात राही.

आणि त्या वेळीं माझी नजर नियमानें त्या चिमण्यांच्या घरट्याकडे जाई.

एके दिवशीं असाच त्या घरट्याकडे पहात बसलों असतां नुक्तेच पंख फुटलेलें असें एक पिलूं त्या घरट्यांतून आपल्या आईच्या पाठोपाठ बाहेर पडलें. पण त्याच्या कोवळ्या पंखांत उड्डाण करण्याची शक्ति नव्हती. तें घरट्यांतून बाहेर पडलें तें थेट जमिनीवर आलें. तिथून त्याला वर उडतां येईना. त्याच्या आईनें जवळच्या झाडाच्या फांदीवर बसून

मोठ्यांदा चिंवचिंवाट आरंभिला. जवळून जाणाऱ्या एका मांजराला चाहूल लागली. त्यानें पटकन् त्या पिलावर झेंप घातली. त्या पिलाचें आयुष्य संपलें. झाडावर पुष्कळच चिमण्या जमल्या. त्याच्या चिंवचिंवटानें सारा भाग भरून गेला.

ही हकीकत कलेला कळली तर ?—जखमेवर मीठ चोळण्याप्रमाणें व्हायचें. पण ही हकीकत कलेच्या लक्षांत खास येणार. आणि—

दुसरे दिवशीं मी कचेरींतून परत आलों. मीं ज्या गोष्टीला भीत होतों, तीच गोष्ट घडून आली.

‘ त्या चिमण्यांचीं पिलं नाहींत दिसत कुठं ? ’ कलेनें विचारलें.

‘ गेलीं असतील उडून. त्यांत काय मोठंसं ? ’ मी बेफिकीरीच्या स्वरांत उत्तरलों.

‘ छे ! छे ! तसं असतं तर आज सारा दिवस ती चिमणी त्या झाडा-वर बसून ओरडत आहे तशी ओरडली नसती.’

‘ मग त्यावरून तूं काय तर्क काढला आहेस ? ’

‘ तिचीं पिलं कावळयानं नाहीं तर मांजरानं नेलीं असतील.’

‘ कदाचित् नेलीं असतील, कदाचित् नेलीं नसतील. त्या पिलांचं काय एवढं घेऊन बसली आहेस ? पक्ष्यांचीं पिलं, तीं मोठीं झाल्यावर उडून जायचींच. जा, अगोदर चहा आण.’

गोष्ट हास्यावारी नेण्याचा माझा प्रयत्न होता तो. पण मनांतून मी वैतागून गेलों होतों. माझ्यापुढचा पेंचप्रसंग ढिला न होतां जास्तच कठीण झालेला होता.

दुसरे दिवशीं कचेरींतून आल्यानंतर मी नित्याप्रमाणें खिडकीजव-ळच्या माझ्या आरामखुर्चीवर पडलों, आणि नित्याप्रमाणें माझें लक्ष त्या घरट्याकडे गेलें.

त्या घरट्यांत जिवंतपणा नव्हता. त्या घरट्याशीं घोंटाळणाऱ्या चिमण्या आज दिसत नव्हत्या. सर्वत्र शांतता आणि स्तब्धता होती.

त्या स्तब्धतेमुळें आणि शांततेमुळें वास्तविक माझ्या मनांत विषण्णता निर्माण व्हावयास पाहिजे होती. पण तसें व्हावयाचें बाजूस राहून मला थोडा आनंदच झाला. आणि त्या आनंदाच्या भरांत मीं हांक मारली ' कले '—

' कले, तो चहा तसाच ठेवून अगोदर थोडी इकडे ये. '

कला आली. माझ्या शेजारच्या एका खुर्चीकडे बोट दाखवून मी म्हणालों—' थोडा वेळ इथं बैस. '

' समोरच्या त्या भितींत असलेल्या बिळांत काय होतं ?' मीं विचारलें.

' चिमण्यांचं एक घरटं. ' तिनें उत्तर दिलें.

' आज तें घरटं तिथं आहे का ? '

' आहे. '

' पण त्या घरट्यांत पिलं आहेत का ? '

' नाहींत. '

' रोजच्याप्रमाणें आज त्या पिलांचे आईबाप त्या घरट्यापाशीं घोंटाळतात का ? '

' नाहींत. '

' काल घोंटाळत होते ना ? मग आज कां नाहींत ? '

' त्यांचीं पिलं नाहींशीं झालीं म्हणून. '

' पिलं नाहींशी झालीं म्हणून त्या चिमण्यांनीं फक्त एकच दिवस शोक केला. आज त्या इकडे फिरकल्यासुद्धां नाहींत. कदाचित् दुसरीकडे त्यांनीं नवीन घरटं बांधण्यास सुरवातहि केली असेल. चिमण्यांच्या या वर्तनापासून मानवांना कांहींच शिकतां येण्यासारखें नाहीं का ? चिमण्यांच्या रूपानं प्रत्यक्ष निसर्गच धडे देत असतां, मानवांनीं ते धडे कां घेऊं नयेत ? त्या दिवशीं मी तुला हेंच सांगत होतों. पण माझे विचार मोठे आहेत, ते आपल्या डोक्यांत शिरत नाहींत, असं म्हणून तूं मला गप्प बसविलंस. माझं शाब्दिक अवडंबर तुला समजलं नाहीं असं मानलं, तरी आजची

ही निसर्गाची प्रत्यक्ष वागणूक, हें प्रत्यक्ष उदाहरण, तुला समजण्यास कांहींच हरकत असूं नये.'

माझ्या बोलण्याचा तिच्यावर काय परिणाम झाला हें पहाण्यासाठीं मी तिचा चेहरा न्याहाळूं लागलों.

ती चटकन् उठून आंत गेली.

मात्र आशा करण्यासारखें कांहीं तरी मला तिच्या चेहऱ्यावर दिसलें.

* * * * *

'दिसलें' कां?—खरेंच होतें तें. कारण चिमण्यांनीं तिला जो गुरु-मंत्र दिला, त्या वेळेपासून तिच्या वागण्यांत थोडाथोडा फरक पडूं लागला आणि आमच्या जीवनांतहि थोडथोडा जिवंतपणा येऊं लागला.

'यशवंत'—आक्टोबर १९३७.

---

# महाकवि : ४

बी. ए. झाल्यावर महाप्रयासानें माझा एकदाचा रेव्हेन्यू खात्यांत प्रवेश झाला आणि माझ्या नोकरीला उणींपुरीं चार वर्षें लोटलीं. नोकरींत पडल्यानंतर अध्ययनाचा, वाचनाचा, आणि माझा संबंध तुटला असं म्हणायला हरकत नाहीं. पण या वियोगाबद्दल मला आनंद न होतां कधीं कधीं विषादच वाटत असे. कारण माझे एका काळचे सहाध्यायी पण अद्याप कॉलेजांतील आयुष्याचा आनंद लुटणारे माझे जिवलग स्नेही श्रीयुत हा—

—पण त्यांच्या नांवाचा उगीच उच्चार तरी कशाला करा? महाराष्ट्रानें आपल्या नांवानें आपल्यास ओळखावें असें त्यांना वाटत नाहीं.

तेव्हां तूर्त त्यांच्या नांवाची अडचण बाजूला सारून महाराष्ट्र त्यांना ज्या नांवानें ओळखतो, त्याच नांवानें आपणहि त्यांना संबोधूं.

कवि–वसंत–कोकीळ !

वसंत—कोकिळ या नांवांतील गोड काव्य लक्षांत न घेतां आजपर्यंत अनेक गद्य तब्येतीच्या लोकांनीं या नांवाची चिरफाड केली आहे. कोणी हा एक सामासिक शब्द आहे असें समजून त्या समासाचा 'वसंत–ऋतूंतील कोकिळ' असा विग्रह केला आहे. तर कोणी 'वसंत आणि कोकिळ' असा विग्रह केला आहे. तर याच्याहि पुढें जाऊन कांहीं जणांनीं या समासाचा 'वसंत म्हणजेच कोकिळ' असा दीडशहाणा विग्रह करण्यासहि कमी केलें नाहीं !—

खुद्द कवि वसंत–कोकिळांना 'तुमच्या नांवांत कांहीं अर्थ आहे का ?' असा सभ्यपणानें ( श्रीयुत वसंत–कोकिळ हे कवि आहेत आणि सभ्यपणा व कुत्सितपणा यांतील भेद कळण्याइतकेहि ते 'कवि' आहेत. ) प्रश्न केला तर तितक्याच गंभीरपणानें ते उत्तरतात– 'भगवान् श्रीकृष्णाचें चित्त योगयुक्त झाल्यावर ज्याप्रमाणें त्यांना गीता स्फुरली त्याप्रमाणें माझ्या योगयुक्त चित्तामधून हे नांव स्फुरलें आहे. आणि भारतीय युद्ध-समाप्तिनंतर एकदां अर्जुनानें श्रीकृष्णांस गीता फिरून सांगण्याची विनंती केली असता श्रीकृष्णांनीं उत्तर दिलें—'तो उपदेश त्या प्रसंगीं अत्यंत योगयुक्त चित्तानें केलेला असल्यामुळें तो पुनः तसाच सांगणें मला अशक्य आहे !' वसंत–कोकिळ या नांवासंबंधींचा प्रकारहि असाच असल्यामुळें मला त्याचा अर्थ सांगतां येत नाहीं.—'

त्यांच्या नांवांत अर्थ आहे किंवा नाहीं याच्याशीं सध्यां आपल्यास काय कर्तव्य आहे ? 'बी' कवींनीं म्हटलंच आहे—

**कां आग्रही रसिका । नांव सांग मज म्हणसी ।**
**नांवांत मोहिनी भासो, सामान्यासी—**

मला सांगायचं होतं तें एवढेंच कीं श्रीयुत 'वसंत–कोकिळां'ना पाहतांच

विद्यार्थि-दशेचा व माझा जो वियोग घडून आला, त्याबद्दल विषादाची लहर माझ्या सर्वांगावरून निघून जाते.

कारण ?—

आम्हां दोघांत केवढें अंतर ? ते विद्यार्थी होते, मी नोकर होतों. ते अध्ययनांत गढलेले, मी गुलामगिरींत रुतलेला; ते कॉलेजांतील विद्यार्थी, मी—मी ?– एक गुलाम—

पण आम्हा मित्रद्वयांत इतकें अंतर होतें तरी दोन ध्रुवांप्रमाणें अगदीं विरुद्ध दिशांना न राहतां दोन विरुद्ध विद्युत्प्रवाह जसे एकमेकांकडे खेचले जातात, तसे आम्ही एकमेकांकडे आकर्षिले जात होतों.

माझ्या जीवनांत कांहीं तरी काव्य आहे, अशी त्यांची कल्पना असल्यामुळें त्यांना मी हवासा वाटे. उलट, ते स्वतः कवि असल्यामुळें ते मला हवेसे वाटत. मिळून काव्य हा, आम्हा दोघांचा आवडीचा विषय होता. आणि आम्हांस एकत्र आणण्यास कांहीं अंशीं हा विषयच कारणीभूत झालेला होता.

म्हणून त्यांच्याकडे गेल्यावर त्यांचें काव्यगायन मला जरूर ऐकून घ्यावे लागे. अनेक खण्डकाव्यें, महाकाव्यें, भावगीतें, विलापिका, सुनीतें इत्यादि इत्यादि—

—ते लिहिणार होते, त्यांचे आराखडे आगाऊच ऐकून घ्यावे लागत.

त्यांच्या भेटीला गेल्यानंतर हा अगदीं ठराविक कार्यक्रम असल्यामुळें आज त्यांच्या घरीं गेल्यावर स्वतांच्या काव्यासंबंधीं ते एक अवाक्षरही बोलेनात तेव्हां मी आश्चर्यचकित झालों.

अनेक तर्क–वितर्कांचें काहूर माझ्या मनांत माजलें. एकाद्या संपादकानें कवि महाशयांचें लिखाण साभार परत तर केलें नसेल ? एकाद्या चोखंदळ टीकाकारानें आपल्या कटु लेखणीचे फटकारे मारून कविमहाशयांचें कोमल हृदय विदीर्ण तर केलें नसेल ? कवि व कवियित्री यांच्यामध्यें कलहाचा दारुण प्रसंग तर निर्माण झाला नसेल ?...

( माफ करा. आपण ज्याप्रमाणें व्यवहारांत वकिलाच्या बायकोला वकिलीण म्हणतों, मास्तराच्या बायकोला मास्तरीण म्हणतों किंवा मुन्सफाच्या बायकोला मुन्सफीण म्हणतों, त्याचप्रमाणें केवळ संवयीमुळें मी शांतावहिनींना कवियित्री म्हणून गेलों! त्या कवियित्री नाहींत. इतकेंच नव्हे, तर कवितेबद्दल त्यांना सवतीमत्सर वाटतो आणि कवि वसंत–कोकिळांनीं तर कवितेचा निदिध्यास घेतला असल्यामुळें त्या पतिपत्नीमध्यें हमेशा खटके उडतात. )

त्या वादळी मनस्थितींत मीं सभोंवार नजर टाकली. सर्वत्र शांत होतें. घरांत शांतता असणें ही गोष्ट शांतावहिनींच्या स्वभावाच्या अगदीं उलट होती. मग या शांततेचा अर्थ काय? मला आश्चर्याचा आणखी एक धक्का बसला.

कवि वसंत–कोकिळ आपल्या कवितेबद्दल अवाक्षरहि उच्चारित नाहींत!–

घरांत सर्वत्र शांतता आहे!—

या अघटित घटनेचा कांहींतरी विलक्षण अर्थ असला पाहिजे.

अखेरीस पर्वत महंमदाकडे येत नाहीं तर महंमदानेंच पर्वताकडे गेले पाहिजे, या न्यायानें मीं विषय काढला.—

‘ मग आपली अगदी अलीकडची कविता म्हणून दाखवतां ना? ’

‘ माझं अद्यावत् लिखाण मला अंतरलं आहे! ’

वसंत–कोकिळांच्या सर्व काव्यांत कधींहि प्रकट झाला नव्हता एवढा करूण–रस त्या एकाच वाक्यांत भरलेला आहे असें मला वाटलें.

‘ म्हणजे म्हणतां तरी काय कवि–बाबू? ’

कॉलेजांत असतांना आम्ही मित्रमंडळींनीं श्रीयुत वसंत–कोकिळांना कविबाबू हें नांव बहाल केलें होतें. आणि कविवर्य रवींद्रनाथ टागोर यांच्या बंगाली पद्धतीचें हें नांव कवि वसंत–कोकिळ यांच्या भावनाप्रधान मनाला फार आवडलें होतें.

‘ त्याचं असं झालं ’—कवि–बाबूंनीं सुरवात केली.

आतां कांही तरी विलक्षण हकीकत ऐकायला मिळणार म्हणून मी जागच्याजागीं सावरून बसलों.

‘ तुम्हांला ठाऊकच आहे कीं, ‘ पॅरॅडाइझ् लॉस्ट ’ या मिल्टनच्या महाकाव्याच्या तोडीचें ‘ विजयनगर–पतन ’ हें महाकाव्य मी लिहायला घेतलं होतं. ’—

‘ बरं मग ? ’

“ महाकाव्य, अन् तेंहि पॅरॅडाइझ् लॉस्टच्या तोडीचं, मग रात्रंदिवस त्यांतच गढून जायला नको का ? ”

‘ अर्थात् ’—

‘ पण आमच्या कुटुंबाच्या लक्षांत ही गोष्ट येत नाहीं. तिला वाटतं मी तिच्याशीं बोलत बसावं, हसावं, खिदळावं, संसारांत मन घालावं. पण ज्याला महाकाव्य लिहायचं आणि तेंहि मिल्टनच्या महाकाव्याच्या तोडीचं, त्याला अशा गोष्टी करायला वेळ मिळेल का ? अशा गोष्टींत सामील होण्यासारखी त्याची वृत्ति असेल का ? ’

‘ छे ! छे ! केव्हांहि नाहीं. महाकाव्य लिहायचं तर अंतर्बाह्य कवितेशी एकरूपच व्हावं लागेल. ’

माझ्या प्रत्येक उत्तरांतील व्याजस्तुति कवि–बाबूंच्या लक्षांत येत नव्हती, हें पाहून मला आनंद होत होता.

‘ बरोबर बोललात. ’ कवि–बाबू म्हणाले. ‘ काव्य हेंच आतां माझं जीवन-सर्वस्व झालं आहे. माझ्या सर्वांगांतून रक्ताच्या ऐवजीं निळीकाळीं शाईच वाहते असं मला वाटतं. फाउंटनपेन् हें आतां माझं सहावं बोट झालं आहे. ’

‘ या अवस्थेलाच तद्रूप होणं असं नांव आहे. आणि ही अवस्था प्राप्त झाल्याखेरीज महाकाव्य लिहिलं जाणं ही गोष्ट शक्यच नाहीं. ’

‘ पण ही अवस्थाच आम्हा उभयतांच्या भांडणाचं मूळ आहे. आज सकाळीं तर आमच्या अर्धांगीनं कालिकेचाच अवतार धारण केला. तिनें

मी लिहिलेले कागद फाडून काय टाकले, माझ्या टेबलावरील पुस्तकं भिरकावून काय दिलीं, सारा हाहाःकार झाला ! पण हें देखील मी शांतपणें सहन केलं. मी बाजारांत गेलों आणि नवीन कागद आणून फिरून काव्य लिहिण्यास सुरवात केलीं.'

' अहाहा ! शांतिब्रह्म !...सॉक्रेटीस तुकाराम इत्यादिकांनीं या शांततेकडे पाहून माना खालीं घालाव्यात !!'

' तुकाराम–सॉक्रेटिस यांनीं खालीं माना घातल्या असत्या कीं नाहीं हें सांगतां आलें नाहीं, तरी तिचा तो कालिकेचा अवतार पाहून जिजाऊ किंवा झांटेपी यांनीं मात्र खास खालीं माना घातल्या असत्या.'

' म्हणजे कागद फाडणं, पुस्तकं फेकून देणं याच्याहिपेक्षां कांहीं जास्त झालं कीं काय ?'

' खूपच जास्त झालं. तावातावानं ती माहेरीं निघून गेली. अन् सडी तरी गेली का ? मुळींच नाहीं. तिनं माझीं सारीं आवडतीं पुस्तकं–माझा होमर, माझा व्हर्जिल, माझा डांटे, माझा मिल्टन,–माझीं झाडून सारीं आवडतीं पुस्तकं बरोबर नेलीं. इतकंच नव्हे, तर माझ्या उजव्या हाताचं सहावं बोट–माझं फाउन्टनपेन्‌सुद्धां माझ्या हातांतून हिसकावून घेतलं अन् बरोबर नेलं. अन् शेवटीं असं बजावलं कीं जोंपर्यंत मी काव्य लिहायचं सोडणार नाहीं तोंपर्यंत ती माझ्या घराकडे ढुंकूनहि पाहणार नाहीं ! आयुष्यांतील माझी सहचरी, आवडतीं पुस्तकं, माझं फाउन्टनपेन्, माझं काव्य हीं सर्वच आज मला अंतरलीं. या जीवनांत आतां काय उरलं ? माझ्या जीवनातलं रमणीय काव्य निघून गेलं ! हा प्रकार सकाळीं दहा वाजतां झाला. त्यावेळेपासून बाहेरच्या वाढत्या उन्हाप्रमाणें माझ्या जीवनाचा उन्हाळाहि मला आतां असह्य वाटूं लागला आहे. हा आतां मला सहन होत नाहीं. माझा कंठशोष झाला आहे. मला निर्झराकडे धावत गेलंच पाहिजे—'

' एकूण महाकाव्य लिहिण्याची कल्पना टाकून देऊन शांतावहिनींना

परत आणण्याचा तुम्ही जो निश्चय केला आहे तो फारच चांगला आहे.' मी खऱ्या कळवळ्यानं म्हणालों. वसंत-कोकिळांचं फाजिल काव्यप्रेम आटोक्यांत येऊन त्यांचा संसार सुखाचा होणार या कल्पनेनेंहि माझं अंतःकरण आनंदानं भरून आलं होतं. पण तोंच कवि-बाबूंचे शब्द कानावर आले—

'छे, हो! महाकाव्य लिहिण्याची कल्पना टाकून देणं या जन्मीं तरी शक्य नाहीं. त्या कल्पनेचा त्याग म्हणजे माझ्या जीवनाचा त्याग. मी तिच्याकडे जाऊन इतकंच म्हणणार आहे कीं 'एक वेळ तूं परत नाहीं आलीस तरी चालेल. पण माझीं आवडतीं पुस्तकं अन् माझं सहावं बोट तें फाउंटन्पेन् तरी मला परत दे. तूं आर्यस्त्री आहेस आणि आपल्या पतिदेवाची एवढी तरी इच्छा पूर्ण करशीलच.'

'शाब्बास! खरा महाकवि! जातिवंत महाकवि!' हे शब्द माझ्या जिभेवर नाचत होते. पण महाप्रयासानें मीं ते मागे सारले.

'महाराष्ट्र-शारदा' दिवाळी अंक १९३७.

---

# जगदाळ्यांची युक्ति ! : ५

आमच्या गांवांत जगदाळे नांवाचे एक कुलीन मराठे गृहस्थ राहात असतात. गांवची पाटिलकी जगदाळे घराण्यांतच आहे, पण ज्या जगदाळयासंबंधीं आम्ही आतां गोष्ट सांगणार आहोंत त्यांच्याकडे मात्र पाटिलकीची पाळी कधींच आली नव्हती आणि येणारहि नव्हती.

तथापि त्यांचा कुलीनपणा, वय आणि सुखवस्तु स्थिति लक्षांत घेऊन गावांतले लोक त्यांना ' पाटील ' म्हणूनच संबोधीत असत. आणि कुठलीशी एक म्हण आहे ना, त्या म्हणीप्रमाणें जगदाळ्यांना प्रत्यक्ष पाटिलकी मिळण्याचा कधींच योग येणार नसल्यानें लोकांकडून स्वतांस ' पाटील ' म्हणून संबोधून घेण्यांतच त्यांना भारी अभिमान वाटत असे.

त्यांच्यासंबंधीं एवढी हकीगत सांगितल्यानंतर त्यांचा स्वभाव कसा असेल हें सहज तुमच्या ध्यानीं आले असेल. लुच्चया लोकांचे पाचपेंच त्या भोळ्या म्हाताऱ्याला मुळींच ठाऊक नव्हते. त्यांतून म्हातारा निपुत्रिक असल्यानें तर कार्यसाधु लुच्च्या लोकांचा घोंळका नेहमींच त्याच्याभोंवतीं जमलेला असे.

मात्र त्यांच्या तोंडावर 'तुम्ही भोळे आहांत' असें म्हणण्याची मुळीं सोय नव्हती. एवढ्या उतारवयांत देखील असले अपमानकारक शब्द कानांवर पडतांच त्यांचें थंड रक्त एकदम गरम होत असें.

त्यांच्या स्वभावांतली ही विशिष्ट खोड ओळखून त्याप्रमाणें बोलणें करणाऱ्या गणपति हवालदार नांवाच्या एका धूर्त तरुणावर जगदाळ्यांचा भारी विश्वास असे. एक वेळ आपल्या कारभारणीला एखादी गोष्ट ते सांगायचे नाहींत, पण गणपतीपासून कांहींच दडवून ठेवायचे नाहींत.

आणि अगदीं अलीकडे कारभारणीचें व त्यांचें कांहीं कांहीं बाबतींत पटेना, तसा गणपति त्यांच्या अधिकाधिक विश्वासांत येत चालला.

आतां हीच गोष्ट ध्या ना! नाहींतरी दहापंधरा वेळां पाटलांनीं कारभारणीला बजावलें असेल—'बाहेर जातांना दार मोकळें टाकून जाऊं नको' म्हणून. पण पाटलीणबाईचा तरी केवढा हट्ट! नवरा सांगतो ना, तर मग तिनें अवश्य दार उघडें टाकून बाहेर पाण्याला किंवा धुवायला जायचें!

सांगून किंवा ताकीद देऊन जेव्हां काम भागेना तेव्हां काय करावें हा पाटलांना मोठा पेंच येऊन पडला. चार दिवस ते एकसारखे डोकें खाजवीत होते. अखेर एकदाची युक्ति सांपडली.

ते धांवत गणपति हवालदाराकडे गेले. गणपतीनें शांत चित्तानें त्यांची युक्ति ऐकून घेतली आणि त्यानंतर ती युक्ति शोधून काढल्याबद्दल त्यानें पाटलांची एवढी कांहीं तारीफ केली, कीं बिचाऱ्या पाटलांना जिवंतपणींच स्वर्गसुखाचा आनंद होऊं लागला.

गणपतीनें एवढी तारीफ केल्यावर ती युक्ति अमलांत आणण्याचा पाटलांचा निश्चय कायम झाला असल्यास नवल नाहीं.

दुसऱ्या दिवशीं तांबडें फुटण्याच्या सुमारास पाटलीणबाई पाणी आणण्यासाठीं विहिरीवर गेल्यावर पाटीलबुवांनीं हळूच पेटीच्या किल्ल्या घेतल्या, पेटी उघडली, आंतले सारे दागिने आणि रोकड बाहेर काढली. त्यानंतर ते दागिने आणि ती रोकड एका मोठ्या जस्ती डब्यांत भरली आणि तो डबा त्यांनीं परसांतल्या बकुळीच्या झाडाखालीं पुरून ठेवला. 'अशी अद्दल घडविली पाहिजे हिला ! एकदां का असा चटका बसला, कीं फिरून दार मोकळें नाहीं टाकायची. अशी वठणीवर आली कीं मग परत करायचेच आहेत तिचे दागिने... वा रे युक्ति ! वा रे युक्ति !!' आनंदातिशयानें पाटलांना नुसत्या गुदगुल्या होत होत्या.

थोड्या वेळानें पाटलीणबाई पाण्याची खेप घेऊन परत आल्या. नित्यक्रमाप्रमाणें पाटलांनींहि आपले बैल सोडले व ते शेताकडे निघाले.

शेतावर आल्यावर त्यानीं औतास सुरवात केली. पण आज कामाकडे म्हणून त्यांचें चित्त लागेना. 'आतां तिचें लक्ष पेटीकडे गेलें असेल, आता तिला पेटींत दागिने नाहींत असं दिसून आलं असेल, आतां ती ऊर बडवून घेत असेल...' जेमतेम न्याहरीचा वक्त होईपर्यंत त्यांनीं दम धरला. त्यानंतर मात्र त्यांना दम निघेना. बैल सोडून घेऊन ते परत घरीं आले.

त्यांच्या अपेक्षेप्रमाणें सर्व काहीं झालें होतें आणि त्यांची अपेक्षा नव्हती असेंहि बरेंच झालें होतें. चोरी उघडकीस आल्यावर आपली बायको घरच्याघरींच ऊर बडवून घेत बसेल किंवा फारतर शेतावर आपल्याकडे ओरडत येईल असा त्यांचा भोळा कयास होता. पण झाला तो प्रकार अगदींच वेगळा ! चोरी उघडकीस आल्यावर पाटलीणबाई ओरडत चावडीवरच गेल्या.

घरीं आल्यावर पाटलांना हें वृत्त कळलें, तेव्हां ते ताबडतोब चावडीकडे धांवले. ते चावडींत आले त्या वेळीं पोलीसपाटील बाईची तक्रार ऐकून घेत होते. जगदाळे पाटील एकदम पुढें झाले. त्यांनीं पोलीसपाटलास आपण योजलेली युक्ति आणि ती योजण्याचें कारण सांगितलें. तेव्हां चावडींत जमलेली सर्वच मंडळी खदखदां हसूं लागली. अखेर

जगदाळे पाटील आपल्या कारभारणीसह परत यायला निघाले तेव्हां पोलिसपाटलांनीं मुद्दाम बजाविलें, ‘ राव, परत गेल्यावर अगोदर यांचे दागिने यांच्या स्वाधीन करा. तुमचा खेळ झाला पण यांच्या काळजाला किती घरें पडलीं त्याची काय वाट ? ’

“ हो ! हो ! हें काय सांगायला पाहिजे कीं काय ! ” असें म्हणत पाटील रस्त्याला लागले देखील.

पाटील परत घरीं आले आणि आपली युक्ति सोळा आणे फत्ते झाली अशा आविर्भावानें त्यांनीं बकुळीच्या झाडाखालचा तो जस्ती डबा उकरून काढण्यास सुरवात केली. थोड्याच वेळांत तो डबा बाहेर निघाला.

“हे घे तुझे दागिने” असें म्हणून पाटलांनीं डब्यांत हात घातला तों–

तों काय ?–तिथें काय होतें ? फक्त दगड नी माती !—

पाटलानीं ऊर बडवून घेण्यास सुरवात केली. त्यांच्या काळजाला हबका बसला. त्यांची स्थिति वेड्यासारखी झाली. त्या स्थितींतच ते चावडीकडे धांवत सुटले.

चावडीवरची मंडळी अजूनहि नुकत्याच झालेल्या प्रकारासंबंधीं बोलत व विनोद करीत होती. तोंच जगदाळ्यांचे ते शब्द त्यांच्या कानांवर पडले. तेव्हां सर्वांनाच अतिशय आश्चर्य वाटलें.

“ काय झालं हो ? ” पोलिसपाटलांनीं विचारलें.

“ माझी युक्ति माझ्याच गळ्यांत आली हो. तिला धडा द्यायला गेलों आणि आतां मलाच धडा घेण्याची पाळी आली हो ! कुणी दुष्टानें आमची चोरी केली. डब्यांत कांहीं नाहीं हो ! फक्त दगड नी माती ! ”

पोलिसपाटलांना हंसावें कीं गंभीरपणानें जगदाळ्यांची तक्रार ऐकून घ्यावी हेंच थोडावेळ कळेना.

जगदाळ्यांच्या युक्तिनें गणपतीचा मात्र चांगला फायदा झाला. जगदाळ्यांनीं त्याचा संशय कधीं घेतला नाहीं अगर कोणास घेऊंहि दिला नाहीं.

‘ मनोहर ’–मे १९३५.

## अपवाद ! : ६

कुठल्याशा लेखकानें एके ठिकाणीं धर्मशाळा, गोशाळा आणि शाळा, या सर्वांतील साम्य दाखवून देण्याचा प्रयत्न केलेला आहे. पण या प्रयत्नांत प्रत्यक्षापेक्षां कल्पनेचाच भाग जास्त आहे.

बारसोडीस मात्र हें साम्य कल्पित नाहीं, प्रत्यक्ष आहे. गांवाबाहेर असलेल्या मारुतीच्या देवळाची पडवी, हेंच गावांतल्या मुलांचें विद्यालय आणि कधींकाळीं त्या आडवळणाच्या गावांत फिरकणाऱ्या मुशाफराची धर्मशाळा !

मोठ्या शहरांतून रस्त्याच्या कडेस पत्र्याचें तात्पुरतें छप्पर उभें करून त्याखालीं व्यापाराचें ठाण मांडणारे पान--पट्टीचे व्यापारी रात्र होतांच

आपल्या दुकानचा माल काखोटीस मारून आपल्या घरीं जातात आणि दुसऱ्या दिवशीं तें सामान परत आणून व्यापार सुरू करतात, त्याप्रमाणें बारसोडीच्या शाळेंत असलेलें फर्निचर (!) शाळा सुटल्यावर त्या पडवीच्या एका कोपऱ्यांत असलेल्या खोलींत टाकण्यांत येई आणि दुसऱ्या दिवशीं शाळा सुरू होतांच फिरून बाहेर काढण्यांत येई.

हें फर्निचर कांहीं फार नव्हतें; एक टेबल, एक खुर्ची आणि एक मोडका फळा ! बस्स !—

पण त्या खुर्चीवर एकदां मास्तर साहेबांची स्वारी आरूढ झाली कीं मग—

बंदुकीचा बार होतांच किंवा दंग्याच्या जागीं पोलिसांची लॉरी येतांच एकदम पळापळ व्हावी, त्याप्रमाणें शाळेंतील सारी किलबिल, सारा गोंधळ एकदम थांबत असे.

आणि हा कांहीं चारदोन दिवसाचा प्रकार नव्हता. कित्येक वर्षांपासून ही शिस्त ठरून गेलेली होती. शाळेचें वेळापत्रक जसें कित्येक वर्षांपूर्वी ठरून गेलेलें होतें त्याप्रमाणेंच ही शिस्त !

वेळापत्रक ? पुस्ती, गणित, वाचन, कविता, शुद्धलेखन, तोंडचे हिशेब, इतिहासांतल्या ओळी पाठ करणें, शहरें पाठ म्हणणे... बस्स ! बस्स ! जास्त सांगण्याची जरुरीच नाहीं मुळीं.

इतके विविध विषय आणि बिनइयत्तेपासून तो थेट तिसऱ्या इयत्तेपर्यंतचे वर्ग ! तथापि चार घोड्यांचे लगाम एकाद्या निष्णात बगीवाल्यानें लीलेनें खेळवावेत त्याप्रमाणें मास्तर त्या चारी वर्गांचे अभ्यास सहज लीलेनें घेत.

अभ्यास हा नेहमींचाच आहे; पण मास्तरसाहेबांचा इतर गोष्टीसंबंधींच जास्त कटाक्ष असे. इतर गोष्टीविषयीं म्हणजे मुख्यतः शिस्तीविषयीं. आणि शिस्तीविषयीं म्हणजे कांहीं कपड्याच्या किंवा वर्तणुकीच्या शिस्तीविषयीं नव्हे; तर कागदाच्या, शाईच्या, लेखणीच्या, वह्यांच्या इ. इ. शिस्तीविषयीं.

त्यांनीं कपड्याच्या किंवा मुलांच्या वर्तनाविषयींच्या शिस्तीबद्दल कां म्हणून दक्षता घ्यावी? उगीच नाहीं त्या भानगडी उपस्थित व्हायच्या! पण उलट विद्यार्थ्यांच्या कागदाबद्दल, शाईबद्दल, लेखणीबद्दल शिस्त अमलांत आणणें मास्तरांना फायद्याचें होतें.

कारण मास्तरांनीं असा सक्त नियम घालून दिला होता कीं कागद, शाई, वह्या, बोरू,—सर्व सामान, शाळेतल्या सर्व मुलांनीं आपल्या जवळूनच खरेदी केलें पाहिजे.

आणि या नियमाविरुद्ध ब्र काढण्याची कुणाचीहि छाती नव्हती.

एकदां मात्र या नियमाविरुद्ध थोडी कुरकूर झाली!

वर्गातला पिन्या गवंडी एक तक्रार पुढें घेऊन आला,—" मास्तर, बाबा म्हनत्योय्, जंगमाच्या दुकानांत राठ ताव पैशाला दोन मिळतात, आन् तुम्ही दीड कसा देतां? "

" काय म्हणतोय् तुझा बाप? जंगमाच्या दुकानात पैशाला दोन ताव मिळतात? पण अकलेच्या कांद्या, ते ताव आणि माझे ताव यातला फरक तुला कधीं कळला आहे का? त्या कागदांवर वाघाचा छाप आणि माझ्या कागदांवर सिंहाचा छाप आहे समजलास. सिंह जसा जंगलाचा राजा तसा सिंहछापाचा कागद म्हणजे कागदांचा राजा आहे. उद्यां दिपोटी आला म्हणजे काय त्याला वाघ छापाच्या कागदांवर काढलेल्या पुस्त्या दाखवायच्या आहेत? मूर्ख नाहींतर! "

आणि त्यानंतर असला प्रश्न फिरून कुणीही, कधींही विचारला नाहीं.

❦ ❦ ❦ ❦ ❦

ही शिस्त गेलीं कित्येक वर्षें चालू होती!

पण अलीकडे अतिवर्षण होऊं लागलें; जागतीक मंदी वाढली; शेतकऱ्यांच्या मालाला भाव येईनासा झाला; आणि मग मात्र मास्तरांच्या शिस्तीचा एकसारखा भंग होऊं लागला!

—आणि याचा अर्थ दरमहाच्या दोन रुपयांच्या उत्पन्नावर मास्त-रांनीं तिलांजली सोडणें !

आतां पगाराचे चौदा रुपयेच मिळवायला दररोज सहा तासाप्रमाणें तीस दिवस राबायचें ! मग या अनायासें मिळणाऱ्या दोन रुपयांची किंमत तर !...

—तेव्हां मास्तर वज्राप्रमाणें कठीणच राहिले.

— तरी शेवटीं एके दिवशीं चमत्कार झालाच !

सगळ्यांनीं कटच केला होता जणूं !...अरेरे, शिस्त अस्त पावत होती !

पिऱ्या गवंड्यानें जंगमाच्या दुकानांतून पैशाला चारवाले हत्तीछाप कागद, दत्तू लोहारानें घरच्याघरीं तयार केलेली शिऱ्याची शाई, दाजी माळ्यानें मळ्यांतल्या देवनाळीची लेखणी,...

'पिऱ्या, गाढवा, ये पुढें असा...हजामा, तुला हजारदां सांगितलं होतं कीं हत्तीछाप कागद आणीत जाऊं नको म्हणून. माझ्याकडचे कागद संपले होते का?

मास्तरांच्या दरडावणीनें बिचारा पिऱ्या चळचळ कांपूं लागला: 'व्हय मास्तर, मी बाबाला सांगितलं...पर.. त्यों म्हणाला . पैसा नाय तवा जंगमाच्या दुकानांत जोंधळे घालून ताव घेऊन...जा म्हणाला. '

' अस्सं ? ठीक आहे ! जा जाग्यावर. '

सुळावरून उतरल्याप्रमाणें आनंदी चेहरा करून पिऱ्या जागेवर परत आला. पिऱ्याचा इन्साफ झाल्यावर दत्तू लोहाराकडे पहात मास्तर गरजले:

' दत्त्या, चल असा पुढें......कायरे लेका, तुला माहीत नाहीं ? शिऱ्याची शाई वापरायची नसते हें तुला माहीत नाहीं ? उद्यां तुझा बाप तो दिपोटी मला विचारूं लागला कीं ' मास्तरसाहेब, पुस्त्या शिऱ्याच्या शाईनें का काढून घेतल्यात ? ' तर त्याला काय तुझा बाप उत्तर देईल ? अं, काय वाटलं तुला ? शिंच्या, माझ्याकडे शाईच्या

पुड्या नव्हत्या होय ? टिळक छापाच्या शाईच्या पुड्या पैशाला एक देऊन सुद्धां तुम्ही शिन्याची शाई आणतां ? '—

' म्या काय मुद्दाम आनली न्हाई मास्तर, आई म्हनली पैसा नाहीं, तवा शिन्याची शाई घेऊन जा. न्हाइतर साळंलाच जाऊ नको म्हनून.

' अस्सं! गाढव कुठला. जा जाग्यावर. तुम्ही गाढव आणि तुमचे आईबाप सवाई गाढव ! '

तोंच दाजी माळ्याची देवनाळीची लेखणी वीज चमकावी त्याप्रमाणें मास्तरांच्या डोळ्यासमोर चमकली.

मास्तराच्या अंगाचा नुसता भडका झाला.

' दाज्या, कसली रे लेखणी ती? देवनाळीची? सागायला लाज नाहीं वाटत? तुमच्याकरतां काळे बोरू मी आणून ठेवलेत नी पैशाला एक प्रमाणें देतों तरी तुम्ही देवनाळीच्या लेखण्या आणतां? गाढवांनों, या लेखण्यांनीं सात जन्मांत तरी तुमचं अक्षर सुधारेल का ? दिपोटी तला नापास करून मोकळा होईल पण अपेशाचं खापर माझ्या टाळक्यावर फुटेल समजलास ? चल टाक ती लेखणी. हा घे नवा बोरू. पैसा उद्यां आणलास तरी चालेल. मात्र उद्यां तरी आणायला विसरूं नकोस हं. '

नाइलाजास्तव घाबरत घाबरत दाज्याला मास्तरनीं पुढें केलेला बोरू घ्यावा लागला.

ॐ ॐ ॐ

तोंच कोंपऱ्यांतून एक मुलगा पुढें धांवत आला व कोणालाहि अगदीं आश्चर्य वाटण्यासारखें बोलला—

' मला एक बोरू हवाय्. ही देवनाळीची लेखणी अजिबात चालेना. '

' तुला काय करायचा रे बोरू ? गाढव कुठला ! बोरूनं काढलं तर अक्षर काय सोन्याचं नी देवनाळीनं काढलं तर काय लोखंडाचं निघतय ? जा जागेवर. '

'पण तो कागद फुटतो आहे ना लिहिल्यावर ?'

'फुटायचाच ! यांत काय नवीन सांगितलंस. पैशाला चारवाले कागद आहेत ते ! फुटायचेच ते. ह्या कांहीं दिपोटीला दाखवायच्या पुस्त्या नव्हत. अक्षर घटवायला चालतील बरं तसले कागद. जा, अगोदर जागेवर जाऊन बैस.'

'आणि दौतीचीं सारखी घाण येतीय !'

'येतांना शाई भरून आणली नाहींस वाटतं ? तुला हजारदां सांगितलं कीं शिऱ्याची शाई वाळली कीं दौतीला घाण येते म्हणून. पण लक्षांत ठेवशील तर शपथ. जा, अगोदर घरीं जाऊन दौत भरून आण !

मास्तरांच्या आज्ञेबरहुकूम तो मुलगा दौत घेऊन बाहेर पडला.

❀ ❀ ❀ ❀ ❀

तो बाहेर पडतांच पिऱ्या गंवडी, दत्तु लोहार, व दाजी माळी आपपसांत कुजबुजूं लागले:—

'त्येला तेवढी देवनाळीची लेखनी चालती !'

'आन् त्येला तेवढा हत्तीछाप कागद चालतो !'

'आन् शिऱ्याची शाईबी चालतीया.'

'अर बाबा, मास्तराचा ल्योक हाय त्यो त्येला सगळं काय चालतय्.

❀ ❀ ❀ ❀

तोंच मास्तरांची मेघगर्जना झाली:

'कायरे, मुकाट्यानें पुढें पाहून लिहितां येत नाहीं होय ? कसली कुजबूज चाललीय तिथें ?'

सर्व सामसूम ! लेखण्यांची गिरगिर काय ती ऐकूं येऊं लागली.

'पारिजात'—नोव्हेंबर १९३४.

---

# सुखाचे क्षण : ७

मॅट्रिकची पूर्वपरीक्षा झाली होती. आणि त्या वेळीं शाळेमध्यें जे विद्यार्थि जात असत ते बहुधा निरनिराळ्या शाळांतून आलेले परीक्षेचे कागद सोडविण्याकरितां जात असत. अर्थात हें काम फार वेळ चालणारे नसल्यामुळें तासाभरानें विद्यार्थि–विद्यार्थिनी परत येत असत.

कुंदा अशीच शाळेंतून घरीं परत येत होती. ती रस्त्यावरून चालली असतां समोरून सायकलीवरून एक तरुण येत होता. कुंदा आपल्या अभ्यासविषयक विचारांत मग्न होऊन गेलेली असल्यामुळें समोरून येणाऱ्या तरुणाकडे तिचें लक्ष नव्हतें. पण जेव्हां तो अगदीं जवळून गेला तेव्हां तिनें त्याच्याकडे पाहिलें. आणि त्याच्याकडे पाहतांच एक चमत्कारिक झिणझिणी तिच्या डोक्यांत चमकून गेली.

त्या तरुणाकडे पाहतांच केवढा तरी इतिहास तिच्या मनश्चक्षूंसमोर उभा राहिला. त्यानें तिच्या वडिल बहिणीवर—आक्कावर एकाकाळीं प्रेम ( ? ) केलें होतें. त्या उभयतांचा विवाहही व्हावयाचा होता. पण आक्कापेक्षां अधिक देखणी आणि अधिक श्रीमंत मुलगी सांगून येतांच त्यानें निर्लज्जपणें आपली सारीं वचनें, सारे विचार, फेकून दिले आणि त्या सांगून आलेल्या मुलीशीं विवाह करून तो मोकळा झाला. आक्कानें त्यानंतर कितीतरी दिवस हाय खाल्ल्यासारखे केलें होतें. तिच्यासंबंधीं उठलेल्या प्रवादांमुळें बाहेर पडणें तिला अशक्य नसलें तरी कठीण झालें होतें. वडिलांनीं आक्काचें नांव शाळेंतून केव्हांच काढलें होतें. आणि वरसंशोधनाप्रीत्यर्थ ते प्रयत्न करीत होते. शेवटीं एकदा आक्काचा विवाह झाला. ती सासरीं गेली. तिला सासरीं जाऊन आता जवळजवळ दीड महिना झाला होता. पण तिच्याकडून कुंदाला अद्यापपर्यंत काहींच पत्र आलें नव्हतें. तिच्या पूर्व आयुष्यांतल्या या प्रकरणाबद्दल कुणी दुष्टबुद्धीनें तिच्या नवऱ्याला कळवलें तर नसेल ? ती सुखांत असेल का ? तिचे यजमान तिच्याशीं कसे वागत असतील ?...

या अनेक कल्पनांचें थैमान कुंदाच्या डोक्यांत सुरू झाल्यावर उन्हानें आरक्तवर्ण झालेला तिचा चेहरा अधिकच लाल दिसूं लागला. मानसिक त्रासाची आणि तिरस्काराची स्पष्ट छटा तिच्या चेहऱ्यावर उमटली.

घरीं पोंचतांच ती सरळ आपल्या खोलीकडे गेली. खोलींत गेल्यावर अभ्यास करण्याचें ठरवून तिनें पुस्तक उघडलें, पण तिचें अभ्यासाकडे बिलकूल लक्ष लागेना. तिनें पुस्तक बाजूस टाकलें. आणि असहाय्यतेनें कॉटवर शरीर टाकून दिलें.

त्या स्थितींत ती कितीतरी वेळ पडून राहिली असती. पण तितक्यांत कुणीसें दारावर टक् टक् केलें.

" कोण आहे ?"

" मी भागू आहे जी. "

" कायरे भागू ? "

" पोष्टमनानं आपल्या नांवाचं एक पत्र दिलया. "

" असं कां ? "

ती चटकन् बिछान्यावरून उठली. तिनें त्वरेनें दार उघडलें आणि भागूकडून तें पत्र घेतलें. लिफाफ्यावरचें अक्षर तर आक्काचेंच होतें. तिचा हात कां असा कापूं लागला ? लिफाफ्याचें तोंड फोडताना ती मध्येंच कां अशी स्तब्ध उभी राहिली ? तिचें हृदय कां असें धडधडूं लागलें ? त्या पत्रांत तशी कांहीं भयंकर बातमी तर नाहीं ना ? कां केवळ कल्पनेनेंच तिची अशी अवस्था झाली ?

तिनें पत्र वाचण्यास सुरवात केली:—

|| श्री ||

बेळगांव.

ता. १५।३।३८

प्रिय कुंदा ईस—

अनेक आशिर्वाद.

माझ्या पत्राची तूं खूपखूप वाट पाहिली असशील नाहीं ? पण मी तरी काय करूं ? हो, पत्र लिहायला इथं बंदी आहे असं नाहीं हो ! पत्र लिहायचीं साधनंही कांहीं कमी नाहींत. अन् पोष्टाची पेटी म्हणशील तर आम्ही फिरायला जातों त्या वाटेवरच आहे.

—खोटं नाहीं. आम्ही खरोखरीच फिरायला जातों.—मग पत्र लिहायला कुठली अडचण आली असाच प्रश्न विचारणार असशील तूं ? खरं सांगूं कां खोटं सांगूं ? खरंच सांगूं ना ? खरं सांगायचं म्हणजे असं कीं, पत्र लिहायचा मला विसरच पडल्यासारखं झालं.

राग आला असेल नाहीं तुला हें वांचून ? पण खरंच माझा नाइलाज

झाला. इकडचा सहवास इतका गोड आहे कीं, त्यामुळें माझ्या अगदीं हृदयाजवळचे विषयही मला कधीं कधीं विसरायला होतात.

हें पत्र कुणालाही दाखवूं नको हं. अगदीं आईला दिखील किंवा दादांना दिखील दाखवूं नको. तूं हें पत्र कुणाला दाखविणार नाहींस ही मला खात्री असल्यामुळेंच मी आतां कांहींसं लिहिणार आहे. शिवाय तें लिहिल्याखेरीज मला समाधानही वाटायचं नाहीं.

पहिल्या भेटीचा प्रसंग...त्यावेळीं त्यांचं सारं अंग कसं लटलट कांपत होतं. मला आश्चर्य वाटलं. पुरुषासारखे पुरुष आणि भ्यायचं कांहींच कारण नसतांना असं लटलट कांपूं कां लागले? स्त्रीस्वभावानुसार मीही भ्यायलें होतें. पण शेवटीं मी विचारायचा धीर केलाच—"हें काय? अंग कां असं कांपूं लागलं?" "पद्मा, माझ्या आयुष्यांतला हा पहिलाच प्रसंग आहे. माझ्या हृदयाचं सर्वस्व मी आज पहिल्यानें तुलाच अर्पण करीत आहे. प्रीतीच्या या पहिल्या क्षणीं हृदयाचाच काय पण सर्वांगाचा असा थरकाप व्हावा हें उचितच नाहीं कां?" एखादी वेली जशी फुलांनीं बहरून जावी तसे माझ्या सर्वांगावर आनंदानें कांटे उभे राहिले. हृदयाची धडधड सुरूं झाली. श्वास जोरानें चालूं लागला. कसली तरी विलक्षण चमक सर्वांगांतून जात आहे असें वाटलें माझ्या आयुष्यांतले अत्यंत सुखाचे क्षण होते ते. ती जी माझी स्थिति झाली ती मी ऐकलेल्या शब्दांमुळें कीं गालावर आदळणाऱ्या उष्ण श्वासामुळें कीं दोन्हीमुळें—कीं आणखी कशामुळें हें मात्र मला सांगतां येणार नाहीं.

कुंदा, मनुष्याच्या आयुष्यांत सुखाचे क्षण निर्माण करण्याचें सामर्थ्य फक्त प्रेमांतच आहे, असं अनुभवानं माझं पक्कं मत बनलं आहे. आतां जास्त कांहीं लिहीत नाहीं.

तुझ्याकडून उत्तराची अपेक्षा करणारी,

**आक्का**

ता० क०:—

माझ्या पत्रांत आलेलं ' पद्मा ' हें नांव वाचून तुला थोडं गोंधळल्या-सारखं होईल. त्याचा खुलासा करायचा राहिला तेवढा आतां करून टाकतें. सासूबाईनीं माझं सासरचं नांव ' लक्ष्मी ' असं ठेवलेलं तुला माहीत आहेच. त्याच नांवानं इकडची सारी मंडळी मला बोलावतात. पण ' पद्मा ' हें आपलं आवडतं नांव त्यांनीं मला दिलेलं आहे. आणि त्या आवडत्या नांवाचा उपयोग...हो, पण करायचा होता तो खुलासा झाला. पुढें उगीच कशाला लिहीत बसूं ?

तुझी

आक्का

पत्र वाचून झालें तरी अजूनही कुंदेचें शरीर थरथर कांपत होतें. ती कॉटवर बसली पण क्षणभरापेक्षां जास्त वेळ तिला बसवलें नाहीं. पुस्त-काचीं पानेंच भरभर चाळ, एखाद्या कवितेंतील चारदोन ओळीच मोठ्यानें म्हण, असे निरर्थक चाळे कांहीं वेळ चालले. तिच्या हृदयाचा थरकांप अजूनही थांबला नव्हता. मनाची अस्वस्थता अजूनही नाहींशी झाली नव्हती. शेवटीं लिहिण्याचें साहित्य घेऊन तिनें पत्र लिहायला सुरवात केली:—

|| श्री ||

पुणें.

ता. १६–३–३८

ती० सौ० आक्का ईस—

कुंदाचा नमस्कार.

तुझं पत्र पोंचलं. पत्रांत तूं म्हटल्याप्रमाणं मला राग मात्र बिलकूल आलेला नाहीं. उलट अतिशय आनंद झालेला आहे. खरंच, किती किती आनंद झाला आहे ! भीतीच्या वेळीं हृदयाचा थरकांप उडून शरीर कांपावं तसं अतिशय आनंदाच्या वेळींही तें थरथर कांपावं, असा शरीर

धर्मच आहे कीं काय कोण जाणें ! तुझं पत्र वाचून कितीतरी वेळ झाला. पण अजूनही जिवाचा थरकांप कसा तो थांबत नाहीं, म्हणूनच असं म्हणावंसं वाटतं कीं—

—आक्का, मनुष्याच्या आयुष्यात सुखाचे क्षण निर्माण करण्याचें सामर्थ्य प्रेमांत असेल पण त्याहिपेक्षा जास्त असें सामर्थ्य **दुसऱ्याच्या आनंदांत आनंद मानण्याच्या वृत्तींत** आहे असं आतां अनुभवानं माझं पक्कं मत बनलं आहे. जास्त काय लिहूं ?

तुझी
**कुंदा.**

' कला '—फेब्रुवारी १९३९

---

# अरुंधतीचीं मनोराज्यें : ८

अरुंधती इंग्रजी पांचवींत आली तेव्हांपासून हळुहळू तिच्या वडिलांनीं तिच्याकरितां योग्य स्थळ पाहण्यास सुरवात केली. पण पुढें दोन वर्षें झालीं तरी लग्नाचें कुठेंच जुळलें नाहीं. या मुदतींत अरुंधती मॅट्रिकची परिक्षाही पास झाली.

मुलगी पहावी, ती पसंत पडावी आणि लग्नाचा घाट जमत यावा तोंच पत्रिका जमूं नये, सगोत्र व्हावें, हुंड्यांत पटूं नये, आणि कधीं कधीं मुलीनेंच स्थळ नाकारावें, असा कांहींतरी प्रकार होऊन जमत आलेला घाट विसकटावा असा प्रकार सतत दोन वर्षें चालला होता.

आपल्या लग्नाचा घाट विसकटतो म्हणून खुद्द अरुंधतीला मात्र

केव्हांही वाईट वाटलें नव्हतें. तिला ज्या ज्या प्रसंगीं पहायला आले त्या सर्व प्रसंगांच्या अनुभवावरून तिनें एक खूणगांठ मनाशीं बांधली होती. ती ही कीं, आपल्याला कुणीही नापसंत करीत नाहीं. सरकारी शिक्क्याची नोट खिशांत असली म्हणजे ती कुठेंही मोडून आपल्या गरजा भागवितां येतील अशी खात्री असावी त्याप्रमाणें आपल्याला रूप आहे, आपल्या लग्नाचें कुठेंही जमेल अशी खात्री गुप्त रूपानें सदैव तिच्या मनीं असे.

आणि खरोखरीच रूपानें ती तशी होती. पण आज मात्र पहिल्यानेंच तिच्या मनांत शंका उत्पन्न झाली. तिच्या अंतःकरणांतल्या खात्रीच्या बुरुजाला लहानसा कां होईना, पण प्रथमच धक्का बसला.

अल्पवयांत महाराष्ट्रात गाजलेले एक नामांकित लेखक आज तिला पहायला येणार होते. गंगाधरराव गुणे हे प्रथमतः एक उत्कृष्ट लघुकथा-लेखक म्हणून महाराष्ट्रापुढें आले. त्यानंतर त्यांनीं कादंबऱ्या लिहिल्या त्याहि त्यांच्या लघुकथाप्रमाणेंच लोकप्रिय झाल्या. आणि अलीकडे महाराष्ट्रांत बोलपट सुरू झाले, तेव्हांपासून त्यांनीं तीनचार सुप्रसिद्ध बोलपटांची कथानकें व संवाद तयार करून दिले होते. अरुंधती ते बोलपट पाहण्यास गेली तेव्हा प्रथमच तिनें रुपेरी पडद्यावर गंगाधरराव गुण्यांचें नांव वाचलें. तेच गुणे पुढें केव्हांतरी आपल्याला पहाण्यास येणार आहेत अशी कल्पनाही त्या वेळीं तिच्या मनात आली नव्हती. पण भविष्य काळांतल्या गोष्टींची जर आगाऊ कल्पना येऊं लागली तर संसारांत रहस्य तें काय राहिलें ?

गंगाधरराव गुणे आपल्याला पहायला येणार हें कळतांच तिच्या हृदयांतल्या खात्रीला न जुमानतां अगदीं पहिल्यानेंच संशयानें तिच्या हृदयांत प्रवेश केला. गंगाधररावांची अभिरुचि कशी असेल ? सौंदर्यासंबंधीं त्यांच्या कल्पना काय असतील ? माझ्यापेक्षां अधिक सुंदर तरुणी त्यांच्या पाहण्यांत आल्या असतील का ? आणि अशा तरुणी त्यांच्या पाहण्यांत आल्या असतील तर त्यांच्याशीं माझी तुलना करण्याची बुद्धि त्यांना

होईल का? आणि तशी बुद्धि त्यांना झाली तर मी नापसंत ठरणार नाहीं ना?...

ज्या वेळीं तिचें मन एका बाजूनें असें संशयाचें जाळें विणीत होतें त्याच वेळीं दुसऱ्या बाजूनें ती आपल्या भावी सुखाच्या संसारासंबंधीं हवेंत उंच उंच मनोरे बांधीत होती. विनाश आणि उत्पत्ति हीं सृष्टीच्या सर्व घडामोडीचीं आद्यतत्त्वें आहेत. मानवी आयुष्यांत देखील जेव्हां महत्त्वाच्या घडामोडी व्हावयाच्या असतात तेव्हां सुद्धां हींच तत्त्वें प्रत्ययाला येत नाहींत का !

तिनें हवेंत बांधलेल्या मनोऱ्यांपैकीं कांहीं अशातऱ्हेचे असतः—'ते' एक प्रतिभासंपन्न लेखक आहेत. डोक्यांत एखाद्या नवीन कादंबरीचें कथानक घोळूं लागलें कीं मला तें अगोदर सांगायचें होईल. एखाद्या बोलपटाच संवाद लिहून झाल्यानंतर त्यावर प्रथम माझें मत घेण्यांत येईल. एकादी सुंदर कथा हातावेगळी झाल्यावर 'हुश्श' करून फाउन्टनपेन बाजूला टाकायचें होईल. आणि चहाची आज्ञा होईल. अशा तऱ्हेच्या प्रत्येक वेळीं माझ्याकडून मी सर्व प्रयत्न करून शीणभार हलका होईल. असें करीन. परमेश्वरानें जी थोडीबहुत बुद्धिमता माझ्या ठिकाणीं ठेविली आहे तिच्या सहाय्यानें त्यांच्या आवडत्या कार्यांत मीहि मोठ्या हौसेनें मदत करीन...

त्यांच्या आवडत्या कार्यांत मीहि मोठ्या हौसेनें मदत करीन!—एका बुद्धिमान् पुरुषाला त्याच्या आवडत्या कार्यांत हौसेनें मदत करण्याची ही कल्पना अतिशय मोहक होती. निदान त्यावेळीं तरी अरुंधतीला ती तशी वाटली.

   

लग्नानंतर मात्र अरुंधतीच्या कल्पनेचे मनोरे प्रत्यक्ष सृष्टींत उतरण्याचें कांहींच लक्षण दिसेना. याचा अर्थ तिला कुठल्या प्रकारची ददात होती

असा नव्हे, किंवा स्त्रिया ज्या गोष्टीबद्दल नेहमीं अत्यंत साशंक असतात ती गोष्ट (त्यांच्या पतिहृदयावर कुणा दुसऱ्या स्त्रीचा अधिकार चालणें) असाही नव्हे. गंगाधररावांचा स्वभाव प्रेमळ होता. किंबहुना तो फाजील प्रेमळ होता म्हणून अरुंधतीची अशी कुचंबणा होत होती. या प्रेमळपणामुळें आकर्षिलेल्या अनेक नव्या जुन्या स्नेह्यांची त्यांच्याकडें नेहमीं रीघ लागलेली असायची. मधूनमधून सिनेमा कंपनींतल्या लोकांची आणि पुस्तक-प्रकाशकांचीहि येजा सुरू असे. या मंडळींच्या येण्याजाण्यामधून जो वेळ रहायचा तो दूरच्या स्नेह्यांना पत्रें लिहिण्यांत, प्रकाशनासंबंधीं पत्र-द्वारें वाटाघाटी करण्यांत असा जायचा. रात्रीं भोजनोत्तर जो निवांत वेळ मिळे तोहि कसल्यातरी वाचनांत किंवा लिहिण्यांत जायचा. दुपारीं सवड मिळेल म्हणावें तर त्यांचें एक कथानक नुकतेंच एका बोलपट कंपनीनें घेतलें असल्यामुळें रोज दुपारीं जेवण झाल्यावर त्यांना स्टुडिओकडे जावें लागे. आणि कंपनी औटडोअरसाठीं बाहेरगांवीं जाईल आणि गंगाधररावांना मोकळीक मिळेल अशी आशा करावी तर औटडोअरसाठीं जातानादेखील कंपनीचे डायरेक्टर पी. विश्वासराव मोठ्या आग्रहानें बोलावून त्यांना बरोबर घेऊन जायचे. आणि अशा रीतीनें गंगाधरराव एकदां का बाहेर गेले म्हणजे पंधरावीस दिवसांत त्यांचें पत्रहि येत नसे. गंगाधररावांच्या बरोबर घरांतली गडबड, गर्दी, जिवंतपणाहि बाहेरगांवीं जाई आणि त्या मोठ्या घरांत फक्त अरुंधती आणि स्वयंपाकासाठीं ठेवलेल्या भीमाकाकू असे दोनच रिकाम्यासारखे जीव रहात.

या परिस्थितीचा परिणाम असा झाला कीं, त्या सिनेमा कंपनीविषयीं, स्टुडिओविषयीं, गंगाधररावांच्या स्नेह्यांविषयीं, एक प्रकारची अढी अरुंध-तीच्या मनांत बसून गेली. गंगाधररावांनीं लिहिलेल्या कथानकाच्या दोन तीन उत्कृष्ट प्रसंगांचें शूटिंग व्हावयाचें होतें; तेव्हां त्यांनीं अरुंधतीला आपल्या बरोबर स्टूडिओंत येण्याविषयीं आग्रह केला. पण वर सांगितलेली अढी अरुंधतीच्या मनांत असल्यानें स्टुडिओंत येण्याचें तिनें साफ नाकारलें.

पण अरुंधतीच्या मनस्तापाची सीमा इथेंच संपली असें नव्हें. घरीं माणसांची येजा सुरू होतांच चुलीवर चहाचें आधण चढें तें कधीं कधीं सबंध दिवसभर खालीं उतरूं नये. आणि भीमाकाकू एकदां कां स्वयंपाकाला लागल्या कीं बाकीचा सारा उरक अरुंधतीवरच पडे आणि तिला बाहेर गंगाधररावांच्या दिवाणखान्यापासून आंत स्वयंपाकघरापर्यंत इकडे तिकडे एकसारखें पळून खेळावें लागे.

कधींकधीं असेही विचार अरुंधतीच्या मनांत येतः—गंगाधररावांना आपल्या दिवाणखान्यांतल्या निर्जीव वस्तूंच्या अस्तिवाची जेवढी खबर आहे तेवढी तरी घरांतल्या माझ्यासारख्या सजीव वस्तूची आहे काय ?—

आणि असे कष्टी विचार मनांत आले कीं, ती आपल्या खोलींत जाई आणि मुळुमुळूं रडत बसे. असल्या सुखाच्या संसारांत आणि भरल्या घरात आपल्या मालकिणीनें हरघडी डोळयाला असें पाणी कां आणावें याचें रहस्य भीमाकाकूंना मुळींच समजत नसे.

असें असूनही खुद्द गंगाधररावांविषयीं अरुंधतीच्या मनात सदैव प्रेम आणि आदर असे. औटडोअरसाठीं पी. विश्वासरावांच्या आग्रहाला बळी पडून बाहेरगांवीं जाणाऱ्या गंगाधररावांना नव्हे तर आग्रह करणाऱ्या पी. विश्वासरावांना तिनें दोष द्यावा. फाजील भिडस्तपणामुळें आणि फाजील प्रेमळपणामुळें हव्या तितक्या स्नेह्यांना घरीं येऊं देणाऱ्या गंगाधररावांना नव्हे तर त्याच्याकडे येणाऱ्या स्नेह्यांना तिनें दोष द्यावा. किंबहुना प्रत्येक बाबतींत अरुंधतीच्या प्रेमळ हृदयानें गंगाधररावांचे दोष दृष्टीआड करावेत आणि दोषांचें खापर दुसऱ्याच्या माथीं फोडावें.

पण आज खुद्द गंगाधररावांचाहि तिला राग यायला एक कारण झालें. गंगाधरराव आज परत आले तेच मुळीं रात्रीचे साडेआठ होऊन गेल्यावर! बरें, परत आले तेही एकटे नव्हेत तर बरोबर डायरेक्टर पी. विश्वासरावांना घेऊन ! बरे, जे आले ते आपण जेवणार किंवा नाहीं, जेवायचें असल्यास केव्हां, याविषयीं अरुंधतीला कांहींच न सांगतां ते पी.

विश्वासरावांच्या बरोबर तडक दिवाणखान्यात गेले आणि थोडक्याच वेळांत एका गंभीर विषयाची चर्चा अरुंधतीच्या कानांवर येऊं लागली.

गंगाधररावांनीं जें कथानक पी. विश्वासरावांच्याकडे दिलें होतें त्या कथानकापैकीं एका महत्त्वाच्या प्रसंगांत फेरबदल करावा असें विश्वासरावांचें म्हणणें होतें. उलट, प्रसंग आहे तसाच असावा असे गंगाधररावांचें म्हणणें होतें. चर्चेनें चर्चा वाढत चालली.

या चर्चेत घड्याळाचे काटे साडेआठावरून नवावर व नवावरून साडेनवावर आले. स्वयंपाक केव्हांच तयार झाला होता; पण गंगाधररावांना वेळ लागूं लागला तसा तो निवून गार होत चालला.

अरुंधतीनें जेवणाची वेळ होऊन गेली असें एकदोनदां सुचविलेंही. आणि एकदां तर दिवाणखान्यांत डोकावून तिनें गंगाधररावांना भानावर आणण्याचा प्रयत्न करून पाहिला. पण कांहींच उपयोग होईना.

साडेनवानंतर मात्र तडजोडीचीं चिन्हें दिसूं लागलीं.

तडजोड होतांच गंगाधररावांना आनंद झाला; आणि त्या भरांत त्यांनीं विश्वासरावांना चहा घेऊन जाण्याबद्दल सांगितलें. विश्वासरावांनीं ‘ रात्रीची वेळ आहे, चहा कशाला !’ अशा मामुली सबबी सांगितल्या; पण त्यांकडे लक्ष न देतां अरुंधतीला हांक मारून गंगाधरराव म्हणाले, ‘ अरू, दोन कप सुंदर चहा हवा बुवा ! ’

चहा ! तिकडे जेवण निवून चाललं आहे नी आता चहा ! अरुंधतीला संयम राहिला नाहीं. ती चटकन बोलून गेली, ‘ जेवायची वेळ होऊन गेली नी या वेळीं चहा ! ’

अरुंधतीचे उद्गार स्पष्टपणें विश्वासरावांच्या कानीं आले. चहा नको अशा अर्थाची मामुली सबब त्यांनीं पूर्वीं सांगितलीच होती. तीच आतां अधिक ओढून धरून ‘ अजून जेवण व्हायचं आहे नाहीं तुमचं ? ’ असें उद्गारून त्यांनीं घाईघाईनें गंगाधररावांचा निरोप घेतला.

अरुंधतीच्या उद्गारांनीं गंधाधरराव मात्र गोंधळून गेले. अरुंधती-

कडून—आणि तीही परक्याच्या देखत—त्याच्या इच्छेची अवज्ञा होण्याचा हा पहिलाच प्रसंग होता. एक चकार शब्दही तोडावाटें न काढतां ते पानावर जाऊन बसले. नेहमींप्रमाणें हंसतखेळत जेवण न होता त्यांनीं कसेतरी चार घास घशाखालीं घातले आणि आचवून ते परत दिवाण-खान्यात आले.

आपले शब्द गंगाधररावाच्या जिवाला लागले ही गोष्ट अरुंधतीच्या तेव्हाच लक्षात आली. आणि त्या शब्दाबद्दल तिला वाईट वाटूं लागलें.

गंगाधररावाच्या प्रमाणें तिच्याही जेवणाचें निवळ सोंग झालें. भोजनोत्तर ती आपल्या खोलींत आली. झाल्या प्रकाराबद्दल दिवाण-खान्यात जाऊन गगाधररावाची क्षमा मागावी असाही एक विचार तिच्या मनात आला. पण दिवाणखान्यात आपल्याला आलेली पाहताच त्याना मनस्ताप होईल अशी शका मनात येताच दिवाणखान्यात जाण्याचे तिला धैर्य होईना.

मनाला काहीं व्यवसाय म्हणून गगाधररावाच्या एका नवीन कादंब-रीचीं प्रुफें जी सकाळच्या डाकेने आली होतीं तीं तिने तपासायला घेतली. नाहींतरी गगाधररावाना तीं तपासायला हवीं होर्तीच. त्यापेक्षा आपणच तीं तपासून टाकल्यास त्याचा तेवढाच त्रास वाचेल......

तथापि तिच्या मनाला लागलेली रुखरूख मात्र यत्किंचित्‌ही कमी होईना अशा स्थितींत अकराचे ठोके पडले. अरुंधती आपल्या जागेवरून उठली, चोरपावलानीं खोलीबाहेर पडली, आणि तिने दिवाणखान्याचा कानोसा घेतला.

गंगाधरराव खोलींत इकडून तिकडे येरझारा घालीत होते. विचारमग्न स्थितींत अशा तऱ्हेच्या येरझारा घालण्याची गंगाधररावांची ही विशिष्ट खोड अरुंधतीच्या पुऱ्या परिचयाची होती.

यावेळीं आपल्याविषयींचेच विचार त्याच्या डोक्यात घोळत असले पाहिजेत असें अरुंधतीच्या हळव्या मनानें घेतले. त्याबरोबर तिच्या मनां-

तली रुखरूख एकदम दुणावली.

ती जड अंतःकरणानें आणि जड पावलांनीं परत खोलींत आली. तिनें खोलीचें दार पुढें लोटलें आणि बिछान्यावर अंग टाकून दिलें. यानंतर असला मूर्खपणा फिरून न करण्याचे हजार निश्चय तिनें मनाशीं योजिले. कांहीं वेळानें उरलेलीं प्रुफें तपासून टाकण्याचें ठरवून तिनें तीं फिरून एकदां हातीं घेतलीं.

होतां होतां बाराचे ठोके पडले. ते ठोके कानीं पडतांच गंगाधरराव आपल्या विचार तंद्रींतून जागे झाले. विचारांनें त्रस्त झालेल्या आपल्या डोक्याला बाहेरील गार हवा लागावी म्हणून ते दिवाणखान्यांतून गच्चीवर जाण्यासाठीं म्हणून बाहेर पडले.

दिवाणखान्याबाहेर येतांच त्यांना अरुंधतीच्या खोलींत दिव्याचा प्रकाश दिसला. 'बारा वाजले तरी अरुंधती अजून जागी आहे!' असें स्वतांशीं पुटपुटत ते अरुंधतीच्या खोलीकडे आले.

खोलीचें दार नुसतेंच पुढें केलें होतें, तें ढकलतांच सताड उघडें झालें. प्रुफें तपाशीत बसलेली अरुंधती एकदम दचकली. 'अरू, तूं अजून जागी आहेस?' गंगाधररावांनीं दारातून आंत येत असता विचारलें.

अरुधतीकडून उत्तर आलें नाहीं.

'काय वाचीत आहेस तें?' तिच्याजवळ येऊन तिच्यापुढें पडलेले कागद पहात त्यांनीं विचारलें.

'देशासाठीं?' आपली नवी कादंबरी? सकाळीं डाकेनें आलेलीं प्रुफें वाचीत आहेस कीं तपाशीत आहेस? खरंच, तपाशीत आहेस?...' गंगाधररावांचा गळा दाटून आला. शब्द उमटेना म्हणून त्यांना थांबणें भाग पडलें.

मध्यंतरीं ते अरुंधतीच्या शेजारीं कॉटवर बसले आणि तिचा गौरवर्ण नाजूक हात आपल्या हातीं घेत ते म्हणाले, 'अरू, मी तुझा एक मोठा अपराध केला आहे! या घरांतल्या प्रत्येक वस्तूप्रमाणें प्रत्येक व्यक्तीचें

आयुष्यही माझ्या सुखाकरितांच आहे असें समजण्याचा मूर्खपणा मी आतां पर्यंत करीत आलों आहे. आपल्या विवाहापूर्वी माझी ही समजूत एक वेळ ठीक असेल पण आपला विवाह झाल्यानंतर माझ्याप्रमाणें एका व्यक्तीचें अस्तित्व या घरीं सुरू झालें हें माझ्या लक्षात यायला हवें होतें.

'माझी चूक मला कळून आली... तुझा स्वभाव किती सहनशील ! विश्वासरावांच्या देखत तुझ्याकडून माझ्या इच्छेची अवज्ञा न होती तर मी केव्हां शुद्धीवर आलों असतों तें देव जाणे !... माझ्या चुकीबद्दल क्षमा करशील ना ?—'

'इश्श ! चूक आपली नव्हे, चूक माझीच झाली. मींच तुम्हाला टाकून बोलल्यें... ..'

'छे ! छे ! चूक तुझी नव्हे, चूक माझीच झाली. मीच तुला वागवावें तसें वागविलें नाहीं...'

चूक कुणाची झाली याची पंचाईत आपल्याला कशाला हवी ? पण परमेश्वरानें कान दिले असल्यामुळें आमच्या कानांवर गंगाधररावांच्या तोंडी असलेल्या काहीं काव्यपंक्ति कधींकधीं ऐकूं येतातः—

**क्षमा करावी मी तुज बाले, आणि तूंहि मातें ।**
**असेंच आतां जडलें आहे दोघांचें नातें ॥**
**परस्परास्तव आपण ऐसा प्रत्ययही आला ।**
**तुजवांचुनि मज सुचेरुचेना मजविणही तुजला ॥**

आणि अरुंधती ?—

—त्याच परमेश्वरानें आम्हास डोळे दिले असल्यामुळें लग्नापूर्वी अरुंधतीनें केलेलीं मनोराज्यें आज प्रत्यक्षांत आलेलीं पहावयास सांपडतात.

'स्त्री'—आगष्ट १९३४.

---

# दोन ओढे : ९

दोन ओढे होते.

ढगांशीं गप्पागोष्टी करणाऱ्या आणि उगवत्या सूर्याचें सर्वांआधीं स्वागत करण्याचा मान मिळविणाऱ्या एका डोंगराच्या माथ्यावर त्यांचा जन्म झाला होता. दोघांची वहात जाण्याची दिशाहि एकच होती.

डोंगराच्या उतरणीवरून धके-चपेटे खात जेव्हां ते मैदानांत आले तेव्हां ते चांगलेच धष्टपुष्ट झाले. लहानपणीं आत्राळ झालेला मनुष्य मोठेपणीं सुखांत पडला कीं नाहीं का आंग धरीत ?—

शरीरानें ते पुष्ट झाले एवढेंच नव्हे, तर मनानेंहि ते पुष्ट झाले.

त्यांच्या आकांक्षा वाढल्या. भावी आयुष्याचीं मनोरम चित्रें आपल्या नजरेसमोर उभीं करण्यांत त्यांना पराकाष्ठेचा आनंद होऊं लागला. तारुण्यसुलभ ध्येयवाद त्यांच्या अंतर्यामीं उचंबळून येऊं लागला.
एकमेकांशीं गप्पागोष्टी करीत मजेनें त्यांचा प्रवास चालला होता.

त्यातला एकजण दुसऱ्यास म्हणाला—

'दोस्त, आपण दोघेहि तरुण आहोंत, पराक्रमी आहोंत, कुलीन आहोंत–तेव्हां आपल्या तारुण्याला, पराक्रमाला, कुलाला साजेल अशीच गोष्ट आपल्याला आपल्या आयुष्यांत नको का करून दाखवायला ?'

'अलबत् !' दुसरा उद्गारला.

'मला वाटतं, आपण दोघेहि खूप मोठे होऊं या. नदीसारखे होऊं या. नद होऊं या आपल्या दोन्ही तीरांवर मोठमोठ्या शहरांना आसरा देऊं या. आपल्या प्रवाहाबरोबर शेकडों गलबतें खालींवर नेऊं या. आपले हात दोहों बाजूंना लांबवर पसरून धरित्रीला अशा युक्तीनें स्पर्श करूं या कीं, आपल्या प्रणयी हातांचा स्पर्श होतांच तिच्या सर्वांगावर रोमांच उभे राहतील अन् ढळलेला हिरवा पदर झटकन् सांवरून घेऊन ती उभी राहील.'

'या शब्दांनीं तूं स्वतःच्या भावनांना तोंड पाडीत नाहींस तर माझ्या मुडपलेल्या तरुण पराक्रमाला आणि मादक प्रेमाला बाहेर पडण्याला वाट करून देत आहेस.'

दुसऱ्या ओढ्याचे हे शब्द उच्चारून झाले न झाले तोंच त्यांच्यासमोर एक टेंकडी येऊन उभी राहिली.

त्या टेंकडीला पाहतांच पहिला म्हणाला—

'काय खट्याळ टेंकडी आहे ही! हिच्यामुळें आतां जोडीनं प्रवास करण्याचं आपल्याला कसं जमणार ?'

'चिडूं नकोस. जगांत असंच चालायचं. भावनावश होऊन जगांत निभाव लागत नाहीं. भावनावश जीव अधःपाताला लौकर बळी

पडतात. आपल्या वडिलाचा निरोप घेऊन आपण निघालों तेव्हा त्या धबधब्यांनीं आपल्याला थोडा का त्रास दिला? असल्या विघ्नसंतोषी लोकाना दुसऱ्याच्या मार्गात विघ्न आणण्यांतच गंमत वाटते. पण त्यांच्या-कडे आपण ध्येयवादी लोकानीं थोडेंसुद्धा लक्ष देऊं नये — आतां आपण भिन्नभिन्न दिशांनीं जाऊं या. मात्र, आपण लौकरच एकमेकांना भेटायचं बरं का? विसरणार नाहींस ना?'

त्या दोघांनीं एकमेकाना निरोप दिला व ते आपआपल्या दिशेनें चालू लागले.

या गोष्टीलाहि कांहीं दिवस होऊन गेले.

आपल्या ध्येयावर नजर ठेवून दोघेहि मार्ग आक्रमण करीत होते.

पण जीवनांतील कष्टमय भागाचाच सतत विचार करीत गेल्यामुळें, ध्येयाची धोंड उराशीं बांधून संसार–सागरांत उतरणें शहाणपणाचें नाहीं असा अनुभव पहिल्या भावनावश ओढ्याला येऊं लागला. त्यानें आपल्या अंगावर नावांना खेळण्यास परवानगी दिली, पण नावांत बस-लेले नावाडी लांकडाच्या फळकुटांनीं आपल्याला निष्कारण चोपून काढ-तात या गोष्टीचा त्याला राग आला. आपल्या दोन्ही तीरावर त्यानें मोठमोठ्या शहरांना जागा दिली. पण त्यायोगें त्या शहरांतली सारी घाण आपल्या अंगावर टाकण्यात येऊं लागली असा अनुभव त्याला आला, तेव्हां तो संतापला. भोंवतालच्या धरित्रीला आलिंगन देण्यासाठीं त्यानें हात पसरले, पण त्या हातांना तसेंच जखडून ठेवून मानवी प्राणी त्याचें रक्तशोषण करूं लागला.

सर्वस्वाचा त्याग करून लोकसेवेला वाहून घेणाऱ्या पुढाऱ्याला लोकांनीं छळावें, गांजावें, अवमानावें; असें झाल्यास तो पुढारी जसा चिडतो, कुढतो, कातावतो, तसाच तो चिडला, कुढला, कातावला, आणि-निराश झाला. तो ध्येयाच्या मार्गापासून ढळला. शेवटीं त्यानें ठर-विलें कीं, ते लोकहि नकोत अन् त्यांची सेवाहि नको! विश्रांति घ्यायची.

पुढें जायचं नाहीं, मागें जायचं नाहीं. पडून रहायचं. मरणाची वाट पहायची आणि ग्रीष्माची तीव्रता जाणवूं लागली कीं पार आटून जायचं, नाहींसं व्हायचं.

त्या क्षणीं दुरून कसलासा आवाज त्याच्या कानीं आला. कसली तरी जुनी आठवण त्याच्या अंतःकरणांत उचंबळून आली. फारा दिव-सांनीं यावयाच्या प्रियजनाला भेटण्याची जी एक उत्कण्ठा मनाला लागते, त्या उत्कण्ठेनें अधीर होऊन तो अंतर कातरूं लागला.

त्याचा तर्क खरा होता. ज्या आवाजाच्या अनुरोधानें तो धापा टाकीत आला तो आवाज त्याच्या लहानपणींच्या दोस्ताचाच होता.

‘ दोस्त, चल, मला कडकडून भेट. ’ तो अधीर ओढा ओरडला.

‘ थांब, असा उतावळा होऊं नको. आपण एकमेकांना कडकडून भेटलों कीं, आपल्यापैकीं कुणातरी एकाला मरावें लागणार, हें तूं विसर-लास कीं काय ? ’

‘ नाहीं, तें मी विसरलों नाहीं. पण जगावं असं मला आतांशा वाटत नाहीं. तुला कडकडून भेटत असतां मला मरण आलं, माझी क्षीण जीवनज्योत तुझ्या जीवनज्योतींत मिळून गेली, तर मी स्वतःला मोठा भाग्यवान् समजेन ! ’

‘ काय बोलतोस तूं हें ? जगावं असं तुला वाटत नाहीं ? इतका वैतागलास कशानं ? ’

‘ जगावं असं मला वाटत नाहीं. कारण ज्यांच्याकरितां मी जगतों, ज्यांच्याकरितां मी एवढें कष्ट उपसतों, ते कृतघ्न लोक माझा पदोपदीं अपमान करतात. ’

‘ मूर्ख आहेत ते. मूर्खांच्या मूर्खपणाकडे लक्ष देऊन शहाण्यांनीं आपलं ध्येय कां टाकून द्यायचं असतं ? ’

‘ ध्येय ? ध्येय ! !–माफ कर, दोस्त, या शब्दाची आतां मला मात-ब्बरी वाटत नाहीं. या शब्दावरील माझा विश्वास आतां साफ उडाला

आहे. माझ्यासारखा अनुभवाचा कडवटपणा तुझ्या तोंडीं आला असतां तर असेच कडवट उद्गार तुझ्या तोंडून देखील निघाले असते. '

' अनुभवाचा कडवटपणा ? लोक आपल्या आंगावर घाणीचे शिंतोडे उडवितात, नावाडी आपल्याला फळकुटांनीं मारतात, लोक आपलें रक्त-शोषण करतात, असल्या गोष्टींना कां तूं अनुभवाचा कडवटपणा म्हणतोस ? वेडा आहेस झालं !–आणि समज, तुझ्या कल्पनेप्रमाणें जरी तो कडवटपणा असला तरी असला कडवटपणा तोंडांतून नाहींसा करण्यासाठीं ध्येयाचं अमृत नाहीं का आपल्यापाशीं ? '—पहिल्या ओढ्याप्रमाणें जीवनप्रवाहांतील कष्टी भागाचाच सतत विचार न करतां, जीवनांतील भल्याबुऱ्या अनुभवांशीं तादात्म्य पावण्यांत दुसऱ्या ओढ्यानें दिवस घालविले असल्यानें त्याचा ध्येयवाद अजून जागा होता.

' फिरून अर्थशून्य शब्द ! काय म्हणे, ध्येय अमृत आहे ! खुळ्या, ध्येय म्हणजे शुद्ध दगड. तो दगड उराशीं बांधून संसार–सागरांत उतरणारा प्रत्येक मनुष्य हमखास बुडायचा. '

' ध्येय म्हणजे दगड ?–तूं दगड आहेस नुसता ! ध्येय म्हणजे संसार-सागर तरून जाण्यासाठीं बांधलेलें जहाज ! पण थांब. आपण हा विषयच सोडून देऊं. जीवनाकडे पाहण्याची आपली दोघांची दृष्टि भिन्न असल्यामुळें, आपल्यामधील हा विरोध कांहींसा बिनतोड आहे. आपण आतां दुसरे विषय काढूं. थांबलास कां असा ? आपण फिरून जोडीनं प्रवास करायचा ना ? '

' प्रवास ? मुळींच नाहीं. मी आतां एक पाऊलहि पुढें टाकणार नाहीं. तूं भेटलास, आनंद झाला. आतां तूं पुढें जा. तुझें तें ध्येय तुझं तूंच पाहून घे. मी इथेंच विश्रांति घेणार. आत्महत्त्या करणं पाप आहे म्हणून मी ती करीत नाहीं. पण देवाघरचं बोलावणं येईपर्यंत मी इथेंच पडून राहणार. '

दूर कुणीसें खड्या सुरांत गात होतें—
‘ कायदा पाळा गतीचा, काळ मागें लागला,
थांबला तो संपला !
धावत्याला शक्ति येई आणि रस्ता सांपडे.
भ्रांत तुम्हां कां पडे ? ’

‘ ज्योत्स्ना ’ जानेवारी १९३७

# देशसेवा ! : १०

‘शान्ते, किती वाजले? पावणेबारा का? शाळेला जायला मला बराच उशीर झाला, नाहीं? बरं, असूं द्या. हें पहा, दोन वाजतां आईला औषधाची एक पुडी अन् एक डोज द्यायचा हं; विसरूं नको. आज रोजचंच औषध नाहीं हो; डॉक्टरनीं औषधांत आज थोडा बदल केला आहे. रोज पुड्या नसतात. आज पुड्या दिल्या आहेत.’ टेबलावरील वेळापत्रकांत पहात आणि पुस्तकाच्या ढिगाऱ्यांतून हवीं तीं पुस्तकें काढीत सीतारामाची चर्पटपंजरी चालली होती.

‘पण दादा, आज जवाहरलाल नेहरूंना पकडलं ना? मग आज बहुतेक हरताळ पडला असेल कीं तुझ्या हायस्कूलला.’

' छे ! हरताळ नाहीं पडायचा. आमचं खासगी हायस्कूल आहे हें तूं विसरतेस. मागच्या खेपेस ज्यांनीं ज्यांनीं हरताळ पाडला त्यांना हेड-मास्तरनीं एकेक रुपया दंड ठोकला होता, आहे ना ठाऊक ? मग या खेपेस कोण हरताळ पाडणार ! दंड देऊनहि हरताळ पाडणारे कुणी नस-तीलच असं मात्र नाहीं; पण दंड देऊन हरताळ पाडण्याइतके आपण कुठं बरं श्रीमंत आहोंत ? बाकी खरं म्हणशील तर माझ्याहि मनांतून आज शाळेला जावं असं नाहीं. पण परिस्थितीच्या चक्रव्यूहांत सांपडलेल्या माणसाला, त्याची इच्छा असो वा नसो, ठरलेल्या मार्गानंच जावं लागतं ' इतक्या वेळांत त्यानें हवीं तीं पुस्तकें पिशवींत भरलीं आणि तो गडबडीनें घराबाहेर पडला.

तो वाड्याच्या पुढील चौकात आला तेव्हां वाड्याच्या मालकाच्या बिऱ्हाडांतून बाहेर पडलेली मोलकरीण त्याला दिसली. तिच्या नवीन पातळाकडे पाहतांच त्याला वाटलं, आई नेसते त्याच जातीचें पातळ आहे नाहीं हें ? हो हो, त्याच जातीचें. चार वर्षांपूर्वी दादा हयात असतांना ही मोलकरीण आपल्याकडे कामाला येत असे त्या वेळीं आईचें एखादें जुनेर तिला वापरायला मिळालें म्हणजे तिला केवढा आनंद होई ! पण आज ? दोन रुपयांचीं पातळं घेऊन तीहि वापरील, आणि परिस्थितीमुळें आई-लाहि तींच वापरावीं लागतात ! आई, आम्हां लेकरांकरितां तूं स्वतःच्या जिवाला किती त्रास करून घेतेस ! तुझ्या स्वार्थत्यागाचें ऋण आतां आम्हांला डोईजड झालें आहे. माझ्या परीक्षांकडे तुझे आशाळभूत डोळे सदैव लागलेले असतात.—मला परीक्षा दिल्याच पाहिजेत. शक्य तितक्या लवकर कुठलीहि नोकरी मिळविण्याचा प्रयत्न केलाच पाहिजे. आईचे कष्ट आतां संपलेच पाहिजेत...मग देशसेवा ? नोकरी आणि देशसेवा दोन्हीहि गोष्टी एकाच कालीं शक्य आहेत का ? जवाहरलालसारखा लाख मोलाचा जीव तुरुंगांत कोंडला जात असतां माझ्या दीडदमडीच्या जीवाला नोकरीचें सुख अनुभवण्याचा काय अधि-

कार आहे ?...

विचाराच्या भरांत तो चौकांतून केव्हांच हमरस्त्याला लागलेला होता. पण रस्त्यावरहि त्याच्या विचारांचीच शून्यता आणि घोंटाळा हीं त्याच्या प्रत्ययाला येत होतीं. कांहीं दुकानें बंद झालेलीं दिसत होतीं; दुसरीं कांहीं बंद होण्याच्या मार्गाला लागलेलीं होतीं. एका कच्छी व्यापाऱ्याच्या दुकानापुढें खादी टोप्या घातलेल्या लोकांचें एक टोळकें जमलेलें दिसत होतें, आणि दुकान बंद करण्याबाबत त्याच्यांत धुसपूस चाललेली ऐकूं येत होती. सरकारी हायस्कूलला हरताळ पाडून हायस्कूलचे विद्यार्थी इकडे तिकडे जात येत असलेले दिसत होते. सीताराम शाळेला जात असलेला पाहून हायस्कूलवर हरताळ पाडून परत आलेले चारपांच विद्यार्थी त्याच्या मागें लागले,—' हरताळ ! हरताळ ! शेम ! शेम ! शाळेला जाणाऱ्या लोकाना लाजा वाटायला हव्यात. ' शाळेला जाताना सीताराम आज खरोखरीच लाजला होता.

वर्गांत जाण्यापूर्वी दाराजवळ तो किंचित् थाबला. आज वर्गांत रोजच्या निम्म्यानेंहि मुलें नव्हतीं. पहिला तास वर्ग-शिक्षकांचा ( क्लास-टीचर ) इंग्रजीचा असे. रोज एव्हांना मास्तरांचें खडें वक्तृत्व रस्त्यावर ऐकूं येईल एवढ्यानें चाललेलें असायचें, पण आज ते खडूची काडी हातांतल्या हातांत झेलीत इकडून तिकडे येरझारा घालीत असलेले दिसत होते.

ती स्तब्धता पाहून सीताराम बराच चपापला. मास्तरना ' आंत येऊं का ? ' असें विचारून त्या स्तब्धतेचा भंग करण्याचा त्याला धीर होईना. मास्तरांची दाराकडे पाठ होतांच तो चोरट्या पावलीं आंत शिरला आणि आपल्या जागीं बसला. त्याची कृति मास्तरांच्या लक्षांत आली. पण आज ते एक शब्दहि बोलले नाहींत.

कांहीं वेळानें मास्तर खुर्चीवर जाऊन बसले. आपल्यासमोर बसलेल्या विद्यार्थ्यांकडे एकवार न्याहाळून पाहून ते उभे राहिले आणि

बोलूं लागले, ‘ हरताळ पाडण्याबद्दल मागच्या खेपेस केलेल्या दंडाचा, निदान या क्लासपुरता तरी कांहींच परिणाम झालेला दिसत नाहीं. तुमच्या क्लासच्या—मॅट्रिकच्या विद्यार्थ्यांनीं तरी असं करायला नको होतं. शाळा आणि देशसेवा दोन्ही गोष्टी एकदम करण्याच्या भरीस पडण्यांत अर्थ नाहीं. तुम्हाला शाळेंत रहायचं तर अभ्यास केला पाहिजे, शाळेस आलं पाहिजे. तुम्हांला देशसेवा करायची असेल तर खुशाल शाळा सोडून द्या आणि देशसेवेच्या मार्गाला लागा. आज वर्गावर बहिष्कार पुकारणाऱ्या आणि उद्यां वर्गात येऊन बसणाऱ्या अनेक विद्यार्थ्यांपेक्षां, आपलं धोरण निश्चित करून शाळा सोडून सत्याग्रहात सामील होणाऱ्या नामजोशाचं वर्तन मला शतपटींनीं अधिक बरं वाटतं...... ’

‘ काय, नामजोशी सत्याग्रहांत सामील झाला ! ’ सीतारामाला एकदम धक्का बसल्यासारखें झालें. ‘ आईच्या शुश्रूषेंत गुतल्यामुळं गेल्या दोन महिन्यांत घराबाहेरच्या जगाचा माझा संबंधच जवळजवळ तुटल्यासारखा झाला आहे. अगदीं शाळेंत येईपर्यंत मला ही बातमी कशी कळली नाहीं ?—

—नामजोशासारख्या गर्भश्रीमंतींत वाढलेल्या कोंवळ्या तरुणाला ‘ क ’ वर्गाच्या कैद्याचे हाल सोसतील का ? त्याच्यासारख्या हुषार विद्यार्थ्यानं शाळेच्या इमारतीपेक्षां तुरुंगाची इमारतच अधिक पसंत केली; तो आपल्या कर्तव्याला जागला. पुढाऱ्याची हांक ऐकूं येतांच हातोहात धावून गेला. —आणि मी ?—’ त्याच्या भावनाप्रधान हृदयाचा कोंडमारा चालला होता.

तासामागून तासाच्या घंटा होत होत्या. शिक्षक वर्गात येत होते, बडबडत होते; किंवा स्वस्थ बसत होते. सीतारामाचें आज कशांतच लक्ष नव्हतें. त्याच्या डोक्यांत कसल्या तरी विचारांची चमत्कारिक खळ-बळ चालली होती.

दुसरा दिवस. सकाळची वेळ. शान्ता चुलीजवळच्या फडताळांत

कायसें पहात होती. सीताराम तोंड धुऊन नुक्ताच आंत आला होता आणि खिळ्यावरील टॉवेल ओढून घेऊन तोंड पुशीत होता.

' शान्ता —'

तिनें वळून पाहिलें.

अजून आई जागी नाहीं का झाली? रात्रभर ती जागीच होती हें मला ठाऊक आहे. अगदीं पहांटे पहाटे तिला डोळा लागला वाटतं?'

' हो; अगदीं पहाटे तिला झोंपेची थोडीं गुंगी आली.'

' शान्ते, आईची प्रकृति आतांशा सुधारत चालली आहे, नाहीं?'

' आहे खरी. सरकारी दवाखान्यांतले डॉक्टर बरेच अगत्याचे दिसतात. एरवीं कोण कुणाची काळजी करतो!—खोलीकडे का निघालास? कॉफी झालीच आहे; घेऊनच जाईनास कां ?'

' किती कप ठेविली होतीस कॉफी ?'

' दोन कप.'

' कुणाकुणाकरितां ?'

' इश्श ! कांहीं तरीच तुझा प्रश्न ! कुणाकरितां म्हणजे ? एक तुझ्याकरितां आणि एक माझ्याकरितां; आईकरितां मागाहून करणार आहें हो. आईला विसरलें असं तुला वाटलं वाटतं ?'

' छे आईला काय विसरतेस तूं !'

' मग विचारण्याचा उद्देश ?'

' वाटलं, भावाप्रमाणं बहिणीलाहि हक्काची जाणीव असते का तें पहावं म्हणून. बाकी तुम्हां बायकांच्या हक्काची जाणीव म्हणजे खाण्यापिण्यापुरतीच. जबाबदारीचं काम अंगावर पडलं म्हणजे—'

' तूं माझी मदत मागितलीस आणि कधीं रे मी तुला मदत करायचं नाकारलं ?' तिनें केविलवाण्या स्वरांत प्रश्न विचारला.

' हो, आतांच एका जबाबदारीच्या कामांत तुझी मदत मला पाहिजे; आणि ती मदत देण्याचं तूं नाकरणारहि आहेस.'

‘ मुळींच नाहीं हो. सांग तरी तें जबाबदारीचं काम.’

‘ मीं सत्याग्रहांत भाग घ्यायचं ठरविलं आहे. मी शिक्षा भोगून परत येईपर्यंत आईच्या प्रकृतीची आणि घरची सगळी जबाबदारी संभाळण्याचं काम तूं केलं पाहिजे !—हां, आतां माघार घेऊं नको; आतां नाहीं म्हणूं नको.’

‘ ऑऽही जबाबदारी......’

पुढचे शब्द तिच्या तोंडून उमटलेच नाहींत. तिच्या चर्येत एकदम फरक पडला. वृष्टीनंतर आकाश निरभ्र झालें तरी डोंगर-दरडीवरून खळखळणाऱ्या पाण्याच्या प्रवाहावरून थोड्या वेळापूर्वी झालेल्या वृष्टीची साक्ष पटते—त्याप्रमाणें शब्दांनीं तिचे विकार प्रकट झाले नाहींत तरी उचंबळून आलेले तिचे मनोविकार तिच्या चेहऱ्यावर रेखाटलेले स्पष्ट दिसत होते. अगोदरच मोजके शब्द बोलण्याचा तिचा स्वभाव असे; आणि त्यात हा धक्का बसतांच मोडकळीस आलेल्या घराची जुनाट भिंत वळवाच्या पावसाच्या पहिल्या तडाख्यासरशीं जमीनदोस्त व्हावी, त्याचप्रमाणें तिची वाचाशक्तिच नष्ट झाल्यासारखी झाली. अजाणतेपणीं कर्त्या बापाच्या पंखाच्या सावलींत वाढल्यामुळें जीवनकलहाचे चटके तिला बसले नव्हते; आणि पुढें बापाचे पंख मृत्यूनें गळून पडले तरी वडील भावाच्या आणि आईच्या प्रेमाची ढाल तिच्या संरक्षणास धांवल्यामुळें प्रत्यक्ष जीवनकलहाशीं तिचा अगदींच थोडा परिचय होता. अशा अपरिचित जीवन कलहाशीं तोंड देणें तिला आतां प्राप्त झालें होतें. तुरुंगांत खितपत पडणाऱ्या भावाची काळजी पाठीवर लादलेली, दुखणाईत आईची काळजी डोक्यावर चढलेली, अशा स्थितींत जीवनकलहाशीं तोंड देण्याची कल्पनाच तिला असह्य झाली. कडकडाट होऊन वीज डोळ्यांसमोर नाचूं लागली असतां डोळे गपकन् मिटावेत त्याप्रमाणें तिची विचारशक्तिच एकदम बधिर झाल्यासारखी झाली.

सीतारामाच्या लक्षांत ही गोष्ट आल्यावांचून राहिली नाहीं. पण तिच्या

स्वभावाचा त्याला पूर्ण परिचय असल्यानें व तिच्या मानसिक खळबळीची बरीचशी कल्पना त्याला पूर्वीच आली असल्यामुळें तिच्या मनोविकाराच्या खळबळीच्या दृश्यानें त्याचा निश्चय हादरण्याच्या अवस्थेच्या पलीकडे गेला होता.

ø ø ø ø ø

सत्याग्रहांत भाग घेतल्याबद्दल सीतारामास आठ महिन्यांची सक्तमजुरीची शिक्षा झाली. हें वृत्त शांतेला आणि तिच्या आईला कळल्यास आज आठ दिवस झाले होते. सुधारणेच्या पंथाला लागलेल्या तिच्या आईला त्या वृत्तानें चांगलाच धक्का बसला व तिनें फिरून आन्थरूण धरलें तिचा आजार फिरून उलटला, व या खेपेस त्यानें चांगलेंच उग्र स्वरूप धारण केलें.

शान्तेची स्थिति तर दिवसानुदिवस अधिकच बिकट होत चालली होती. तिच्या आईच्या आजाराची गोष्ट आता नित्यातलीच होऊन बसल्यानें शेजारीपाजारीहि तिच्या साहाय्यास येईनासे झाले. आईच्या औषधपाण्याचें, घरातल्या व्यवस्थेचें, बाजारहाटाचें—अशीं सर्वच कामें तिला दिवसा पहावीं लागत, आणि रात्रीच्या रात्री आईच्या आन्थरुणाशीं जागून काढाव्या लागत.

रात्रींची बारा वाजण्याची वेळ. आईचा ताप चढूं लागल्यामुळें शान्ता तिच्या कपाळावर दुधाच्या घड्या ठेवीत होती. कांहीं वेळानें तिचें विव्हळणें थांबलें आणि तिचा किंचित् डोळा लागला.

शान्ता तिच्या उशाशीं तिच्याकडे पहात बसली होती. एकाएकीं तिला सीतारामाची आठवण झाली. त्या दिवशीं सकाळींच तुरुंगांतून त्याचें पत्र आलें होतें. पत्रांतल्या बहुतेक गोष्टी तिलाच अनुलक्षून होत्या. तिनें आईच्या प्रकृतीला जपावें, स्वतःच्या प्रकृतीला जपावें—एक ना शंभर गोष्टी. स्वतःविषयीं त्यानें एवढाच मजकूर लिहिला होता—

' शान्ता, तुरुंग तुरुंग म्हणून या बंदिशाळेचा बाहेर उगीच बाऊ करून ठेविला आहे. तुरुंगांतसुद्धां एक प्रकारचा मजेशीर आयुष्यक्रम आहे हो. माझ्या वयाचे इथं पुष्कळच तरुण जमा झाले आहेत. आणि ते सुद्धां महाराष्ट्राच्या एका विशिष्ट प्रान्तांतलेच नव्हेत, तर आमच्या या कोठडींत अखिल महाराष्ट्रीय कर्त्या तरुणाची एक छोटी काँग्रेसच भरली आहे म्हणेनास.'

त्या सबंध पत्रात शान्तेच्या मनावर जर कुठली गोष्ट विशेष बिंबली असेल तर सीतारामाचा हा स्वतःसंबंधींचा उल्लेखच होय. त्या मजकुराची त्या वेळीं तिला फिरून आठवण झाली. ' दादा, दादा! सगळं खोटं लिहिलं आहेस बरं तूं. तुझ्याविषयीं आम्हाला इथं काळजीचा भाग राहूं नये म्हणून तुझा हा केवढा खटाटोप! तुरुंगांतले हाल निमूटपणें सोसून अगदीं मायेच्या माणसाजवळसुद्धा तूं त्या हालाचा उच्चार करीत नाहींस! केवढा मनोनिग्रह! एवढा दांडगा मनोनिग्रह ज्या कार्याला वाहिला तें यशस्वी का होऊं नये ? '

तिच्या मनाची अत्यंत व्याकुल अवस्था झाली. ती चटकन् आपल्या जागेवरून उठली आणि लगबगीनें देवघरांत गेली. देवाजवळ तिला पुष्कळच मागून घ्यायचं होतं; करुणा भाकायची होती. पण देवापुढें उभे राहतांच तिला कांहींच सुचेना. तिनें धरणीवर अंग टाकलें व ती तेथेंच पडून राहिली.

तोंच तिच्या आईनें हांक मारली, ' सीताराम ! '

शान्ता चटकन् शुद्धीवर आली. ' आले हं. ' असें म्हणत धांवतच ती आईच्या बिछान्याजवळ गेली. ' आलास ? बाळा, फार चांगलं झालं हं. भेटलास एकदांचा. बाळा, मी आतां जगायची नाहीं रे. शान्तेला संभाळ बरं.' तिनें आपले अशक्त हात वर केले. शान्तानें आपलें तोंड पुढें केलं.

' आई, मी सीताराम नव्हे—मी शान्ता.' असें म्हणण्याचें तिच्या

अगदीं जिभेवर आलें होतें. पण तिनें आपलें तोंड पुढें केलें तेव्हां आईचें तें भेसूर स्वरूप पाहून तिचे शब्द जिभेवरच्या जिभेवरच विरून गेले. ते काळवंडलेले आणि खोल गेलेले गाल ! आणि डोळे —! उठण्याचा प्रयत्न करीत करीत तिच्या आईनें आपल्या अशक्त हातांनीं एकवार तिचें तोंड कुरवाळलें आणि समाधानाचा एक दीर्घ सुस्कारा सोडून तिनें आपलें डोकें खालीं टाकलें ! आईच्या तोंडून फिरून शब्द उमटला नाहीं. ती मधून मधून हंसत असल्याचा मात्र भास होत होता. शान्तानें थर्मामीटर लावून पाहिला. ताप सहा डिग्रीपर्यंत चढला होता ! तिनें मदतीची किंकाळी फोडली.

—आणि त्याच वेळीं इकडे सीतारामाला स्वप्न पडत होतें—' तुरुंगांतून त्याची सुटका झाली व तो घरीं जाऊन पोहोंचला तेव्हां मध्यान्ह झाली होती. पुढच्या चौकापासून अगदीं आई निजली होती तेथपर्यंतचे दरवाजे तो येतांच आपोआप उघडले. तो आईच्या बिछान्याजवळ जातांच तिनें आपले क्षीण हात वर उचलले आणि त्याचें तोंड कुरवाळीत ती म्हणाली, ' आलास ? बाळा, फार चांगलं झालं हं. भेटलास एकदांचा. बाळा, मी आतां जगायची नाहीं रे. शान्ताला संभाळ बरं.' त्यानंतर समाधानाचा एक दीर्घ निःश्वास तिनें सोडला. तिचे शब्द कानांत घुमत असतांच सीताराम जागा झाला. क्षणभर आपण कुठें आहोंत याचाच त्याला उमज पडेना. दुसऱ्या क्षणीं त्याला आपण कुठें आहोंत हें पक्कें कळून आलें. तो चटकन् आपल्या अंथरूणावरून उठला. त्यानें कोठडींत इकडून तिकडे एकदोन येरझारा घातल्या. तो मध्येंच थांबला. त्याचे डोळे अश्रूंनीं भरून आले. त्याच्या सद्गदित कंठातून उद्गार बाहेर पडले—

" शान्ते, आपल्या आयुष्यांतील ही अत्यंत निकराची आणि आणीबाणीची वेळ आहे. या वेळीं तूं मनोनिग्रह सोडूं नको. तुझे हाल मला इथून दिसत का नाहींत ? पण कर्तव्यापासून आपणाला च्युत

होऊन भागणार नाहीं. शान्ते, आम्हां राजबंद्यांना शिक्षा झाल्या; आमचीं नांवं वर्तमानपत्रांतून फडकलीं. आमच्या हालाची तुरुंगाबाहेरच्या लोकांना जाणीव आहे, येवढं तरी आम्हां तुरुंगवासीयांना समाधान आहे. पण तुझ्यासारख्या हजारों कष्टी जीवाना असं कुठं समाधान आहे! खरं हाल तुम्हीं भोगता; जीवन–कलहांतले तुम्ही खरे झुंझारवीर–तुम्ही देशभक्त—तुम्ही खरे देशभक्त!"

रात्रीच्या भयाण अंधेरात त्या कर्तव्यनिष्ठ राजबंद्याच्या डोळयांतले पहिले अश्रु कुणालाहि दिसले नाहींत.

'यशवंत'—मार्च १९३३

---

# विमल लॉंड्री : ११

त्या दिवशीं गिरगांव बॅकरोडच्या बाजूस एका अरुंद बोळांतल्या चाळींत राहात असलेल्या माझ्या एका मित्रास भेटण्यासाठीं मी गलों होतों. दिवस पावसाळ्याचे होते. तथापि मी ज्यावेळीं त्या मित्राकडे जाण्यास निघालों त्यावेळीं कसे लख्ख ऊन पडलें होतें. पण माझें काम आटोपून मी बाहेर यायला आणि पावसास सुरवात व्हायला एकच गांठ पडली. चार शितोडे पडून जातील असाच त्यावेळीं पावसाचा रागरंग असल्यानें मी त्या मित्राच्या खोलींत न थांबतां तसाच बाहेर पडून कांहीं अंतरावर गलों. मध्यंतरीं पावसाचा जोर कमी न होतां तो वाढतच गेला. माझ्याजवळ छत्री नसल्यानें मला शेवटीं एका दुकानाच्या आश्रयास जावें लागलें.

## विमल लॉंड्री

ज्या दुकानाचा मी आतां उल्लेख केला तें दुकान म्हणजे कपडे धुऊन मिळण्याचें दुकान ( लॉंड्री ) होतें. माझ्या डोक्यावर कांहीं अंतरावर एक मोठी पाटी लटकत होती आणि त्या पाटीवर मोठाली 'विमल लॉंड्री' हीं अक्षरें रंगविलेलीं होतीं. आंतल्या बाजूस एक मोठें टेबल होतें. त्या टेबलावर एका बाजूस पिंगट कागदांत व्यवस्थेनें बांधलेलीं आणि वर निळ्या पेन्सीलनें आंकडे टाकलेलीं अशीं धुवून तयार ठेवलेल्या कपड्याचीं पुडकीं दिसत होतीं. टेबलाच्या दुसऱ्या बाजूस काहीं वह्या आणि एक पावती–पुस्तक दिसत होतें. त्या टेबलाशीं काटकोन करून एक मोठें कपाट उभें होतें. त्या कपाटावरहि पिंगट कागदांत बांधलेलीं कपड्याचीं कांहीं पुडकीं दिसत होतीं. कपाटात ताज्या परीटघडीचे कांहीं रेशमी व लोकरी कोट व्यवस्थेनें टांगलेले दिसत होते. कपाटाच्या पलीकडे एक पुरुषभर उंचीचा पडदा अर्धवट ओढलेला दिसत होता. आणि त्या पडद्याच्या पाठीमागें एक मनुष्य धुवून आलेल्या कपड्यावर इस्त्री फिरवीत उभा होता.

त्या मनुष्याची एकंदर सजावट मोठी चमत्कारिक होती. त्याच्या डोक्यावरचे केस वाढलेले होते. दाढीही वाढलेली होती. त्याच्या केसांना तेलाचा दुरूनसुद्धा वास कधीं मिळत असेल अशी शंका येण्याचें कारण नव्हते. गळ्याभोंवतीं गुंडाळलेल्या काळ्याभोर जानव्याचा पीळ खालीं छातीवर रुळत होता आणि त्या पिळाचें खालचे टोक त्याच्या छातीवरच्या केसांच्या जंगलांत लुप्त झालेलें होतें. त्यानें अंगात एक फाटका शर्ट घातलेला होता. शर्टला हाताचीं अगर छातीवरचीं बटणें नव्हतीं. त्याची सर्वच अंगयष्टि सुदामदेवाशीं साम्य पावत असल्यामुळें शेतांवर ठिकठिकाणीं ताली घातलेल्या असाव्यात आणि त्या तालींवर काळें गवत उगवलेलें असावें असा त्याच्या छातीचा एकंदर देखावा दिसत होता. त्यानें पायांत एक सैलसा पायजमा घातलेला होता. पण तो पायजमा त्याचा नसावा असे वाटण्यास भरपूर पुरावा होता. कारण तो पायजमा त्याच्या घोट्यावर बऱ्याच

अंतरावर लटकत होता.

हा चमत्कारिक मनुष्य मधूनच माझ्याकडे क्षणभर टक लावून पहात असे आणि फिरून आपल्या कामात गर्क होत असे. त्याचा तो वेश, ती शरीरयष्टि आणि एकसारखें चाललेलें तें काम पाहून मला त्याच्याविषयीं सहानुभूति वाटूं लागली. ज्यानें समाजाला सुंदर कपडे ल्यायला द्यावेत त्याच्या अंगात मात्र असे भिकार कपडे असावेत, ज्यानें लोकांच्या शरीराची शोभा वाढवावी तो स्वतः मात्र कुरुपतेचा पुतळा असावा... काय ही समाजरचना!... अशा तऱ्हेचे विचार माझ्या मनांत घोळत होते.

बाहेर रस्त्यावर एकसारखा सप् सप् पाऊस पडत होता. पण तशा पावसातूनहि ट्रामगाड्या खाड खाड करीत चालल्या होत्या, मोटारी पळत होत्या, व्हिक्टोरियावाले मेटाकुटीनें रस्ता काढीत होते. पादचारी लोकांपैकीं कांहीं जणांनीं छत्र्या उघडल्या होत्या. कांहींजणांनीं अंगाभोंवतीं पावसाळी कोट लपेटले होते, तर कांहींजण तसेच भिजत पळत जात होते· तें सारें दृश्य पाहून माझ्या मनांत विचार आले—किती वेडे लोक आहेत हे ! असल्या पावसांत यांचीं अशीं काय कामें नडून राहिलीं आहेत ? आणि पावसांतून भिजत पळत जाणारे हे लोक तर अगदींच वेडे नव्हेत का ? यांना असेच पकडून ठाण्याला रवाना केले पाहिजेत...

माझे असे विचार कितीतरी वेळ चालत राहिले असते. पण तितक्यांत आंत इस्त्री करीत उभा असलेल्या माणसानें मला हाक मारली—'साहेब!' मीं मागें वळून पाहिलें. साहेब, आंत या ना. असे दारांत का उभे ? या, असे या, खुर्चीवर बसा.'

मी तरी याच शब्दांची वाट पहात होतों. मी आंत गेलों. आणि त्या खुर्चीवर बसलों. माझ्या शेजारीं एक स्टूल होतें. त्या स्टुलावर त्यानें इस्त्री पेटविण्याकरितां घेतलेल्या कोळशांची पूड शिल्लक राहिलेली होती. मी ज्या खुर्चीवर बसलों होतों ती एक जुनी—पुराणी खुर्ची होती.

तिचा एक हात निखळलेला होता. आणि एक पायही हालत होता. त्या गृहस्थानें मला खुर्चीवर बसायला सांगितलं आणि फिरून तो आपल्या कामांत मग्न झाला. तिथलें तें गरम वातावरण आणि माझ्या शेजारीं काम करीत असलेला तो चमत्कारिक मनुष्य यामुळें माझ्या मनाला तिथें कांहीं बरें वाटेना. पण बाहेर पावसाचा जोर अजूनहि कमी झालेला नव्हता. तेव्हां तिथें आणखी कांहीं वेळ बसून राहण्याखेरीज गत्यंतर नव्हतें.

मध्येंच त्या चमत्कारिक गृहस्थानें आपलें काम थांबविलें आणि मला विचारलें—' साहेब, आपलं शिक्षण काय झालं आहे ? '

' मी एम्. ए. झालों आहें. ' मी म्हणालों.

' काय म्हणतां ? एम्. ए. झालेले आहांत ? फारच चांगली गोष्ट—बरं आपण राहणारे कुठले ? '

त्याच्या या प्रश्नांचा रोखच मला कळेना. तथापि मी उत्तर दिलें—' मी कोल्हापूरकडचा राहणारा '

' काय म्हणतां ? तुम्ही कोल्हापूरकडचे राहणारे ? मग तर राव तुम्ही आमच्याच मुलखांतले ! ' त्यानें विकट हास्य केलें. इस्त्री उचलून खालीं एका लोखंडी कड्यावर ठेवली. आणि चटकन् माझे दोन्ही हात आपल्या हातांत पकडून तो माझ्या शेजारच्या कोळशाच्या पुडीनें भरलेल्या स्टुलावर बसला.

त्याच्या या आकस्मिक फाजील सलगीनें मी चांगलाच चरकलों. तथापि तशांतहि मी विचार सोडला नाहीं. खडबडीत दिसणाऱ्या खडकांतून एकाद्या वेळीं गार पाण्याचा झरा वाहतो त्याप्रमाणें या चमत्कारिक दिसणाऱ्या माणसाच्या मनांत खरोखरच माझ्याबद्दल ममता निर्माण झाली असेल असा विचार करून मी मनांतल्या मनांत माझी समजूत घालूं लागलों.

' वा ! राव, फार दिवसांनीं भेटला. अगदीं भाऊ भेटल्यासारखा आनंद झालाय् मला. तुम्ही आमच्याच मुलखांतले नाहीं ? हो ! हो ! तुम्ही

सांगितलंच कीं तसं ! मग मी माझं मन तुमच्यासमोर खुलं करूं का ? मला तुम्ही वेडा तर म्हणणार नाहीं ना ? '

त्याच्या हातांतून मी माझे हात सोडविण्याचा प्रयत्न करीत होतों पण त्यानें माझे हात अधिकच घट्ट पकडून ठेवले.

' तुम्ही बाहेरची पाटी वाचली ? काय लिहिलय् तिथं ? ' विमल लॉंड्री ' असंच लिहिलय् ना ? माझ्या लॉंड्रीला मी ' विमल लॉंड्री ' असं नांव कां दिलेलं आहे हें माहीत आहे का तुम्हाला ? सांगा. माहीत आहे तुम्हाला ?—

' नाहींना ? मग सांगतों ऐका तर—' कशाला मी या दुकानांत आलों असें मला होऊन गेलें होतें. पण आतां त्या गृहस्थाची हकीगत ऐकून घेण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. कारण त्यानें माझे हातच बळकट पकडून ठेवले होते.

' मी मॅट्रिकच्या वर्गांत होतो तेव्हां माझ्या वर्गांत एक मुलगी होती. तिचं नांव विमल. हो विमल. विमल. वि...म...ल ! '...

मध्येंच तो चटकन् उभा राहिला. अर्थात् त्यावेळीं त्यानें माझे हात सोडले. तो उगीचच बाहेर शून्य दृष्टीनें पाहूं लागला. ही संधी बरी आहे हें पाहून मी हळूंच तिथून उठलों. पण मी उठलेला पाहतांच फिरून त्यानें माझे हात पकडले आणि मला खालीं बसवले.

' माझं त्या मुलीवर प्रेम होतं अशी शंका नाहीं ना तुम्हाला आली खरं सागा, अगदी खरं सांगा '—

कुणीकडून तरी मला त्याच्या तावडींतून सुटायचें होतें म्हणून मी म्हणालों—' छे! छे! अशी शंका मला मुळींच आलेली नाहीं. '

' अच्छा. ' असें म्हणून त्यानें माझे हात सोडले. ही स्वारी पुन्हा माझे हात पकडणार नाहींना, ही भीती मला वाटत होतीच. तिथून पळून जाण्याचा प्रयत्न केला असता तर त्यानें मला घट्ट पकडून ठेवलें असतें हें उघड होतें. तेव्हां गोडीगुलाबीनेंच काम उरक-

ण्याचा विचार करून मी म्हणालों ' आतां पाऊसहि कमी झालेला आहे, मला थोडं जरूरीचं काम आहे. तेव्हां मी आतां जातों. ' बोलत असतां मी चालायला देखील लागलों.

माझ्या मागोमाग ती स्वारी येतच होती, आणि तोंडानें सारखें चाललें होतें ' अहो पण माझी हकीगत अर्धवटच राहिली.. मी त्या मुलीवर कधींहि प्रेम केलं नाहीं...खरं सांगतों, अगदीं शपथपूर्वक खरं सांगतों...'

मी दुकानच्या पायऱ्या धडधड उतरून रस्त्यावर आलों, तोंच पुढून एक गृहस्थ आला. त्यानें मला थांबविलें. त्याच वेळीं आंतला तो चमत्कारिक गृहस्थ ' विमल लॉंड्री ' या पाटीखालीं उभा राहून ओरडत होता—' खरं सांगतों, अगदीं शपथपूर्वक खरं सांगतों '—

तितक्यांत त्याची दृष्टि मला थांबवून धरणाऱ्या गृहस्थाकडे वळली. तेव्हां लहान मुलें जशी जीभ चावतात तशी जीभ चावून तो झटकन् आंत पळून गेला.

मला थांबवून धरणाऱ्या गृहस्थानें विचारलें:—

' काय कपडे न्यायला आला होता तुम्ही ? '

' नाहीं. पाऊस आला म्हणून थोडावेळ तुमच्या दुकानांत थांबलों होतों. ' मी म्हणालों.

' मग तो मनुष्य तुम्हाला कांहीं बोलला काय ? तो कांहीं बोलला असेल तर तें मनावर घेऊं नका. त्याचा मेंदू थोडा बिघडलेला आहे.'

मला थांबवून धरणारा गृहस्थ दुकानांत गेला. पाऊस अजूनहि बारीक बारीक पडत होता. छत्री न घेतलेले कांहीं लोक पावसातून पळत होते तसा मीहि पळत होतों. थोड्या वेळापूर्वी पावसांतून भिजत जाणाऱ्या या लोकांना मी वेड्यांत काढलें होतें आणि आतां मी स्वतांच भिजत पळत होतों. मग मीहि वेडाच होतों का ? दुनियेंत वेड्यांचीच गर्दी झालेली आहे का ?—

मी ट्रामनाक्याजवळ येऊन पोंचलों. एकदां मी मागें वळून पाहिलें. ' विमल लॉन्ड्री ' ही पार्टी कुठेंहि दिसत नव्हती. ती माझ्या नजरेच्या टप्प्याबाहेर राहिली होती. जडमूढ अतःकरणानें मी उभा होतों. तोंच मला हवी असलेली ट्राम येऊन थांबली. तींतून मी घरीं परतलों.

' चद्रकला '

---

# तंटा कसा मिटला ? : १२

आपल्या कष्टानं मिळविलेल्या अन्नाचे चार घास सुखानं खावेत असं म्हणून मनुष्य वागूं लागला तरी त्याला ते घास सुखानं खाऊं देऊं नयेत अशीच जगाची रीत आहे कीं काय कोण जाणें ! असं नसतं तर शेलारना दिवाणी कोर्टाची पायरी चढण्याचा प्रसंग कां बरं आला असता ?

आज शेलारांचें वय सुमारें पस्तीस वर्षांचं आहे. वयाच्या सतराव्या वर्षीं त्यांनीं घर सोडून सर्कसींत प्रवेश केला. त्या काळीं तासगांवचे परशराम माळी यांच्या सर्कसचे नांव महाराष्ट्रांत बरंच गाजलं होतं. तेव्हां निदान तासगांवच्या तरुणांपुढें तरी परशुराम माळी यांचाच आदर्श असे. शेलार तासगांवचे रहाणारे. तेव्हां कळं लागल्यापासून त्यांनीं परशुराम माळी

यांचाच आदर्श डोळ्यांसमोर ठेवला होता. आणि संधी येतांच सर्कसचा मार्ग धरला होता.

परशुराम माळ्यांच्या सर्कशींत सिंगल बारवरचीं आणि झोल्यावरचीं कामें उत्कृष्ट रीतीनें करणारे कसरतपटु म्हणून शेलारचा लौकिक असे. म्हैसूरच्या मुक्कामांत शेलारना एक मोठा अपघात झाला. प्रकृति साधारण बरी व्हायला म्हैसूरच्या दवाखान्यांत त्यांना दोन महिने पडून रहावें लागलें. प्रकृति साधारण बरी झाल्यावर त्यांनीं आपल्या सर्कशीची चौकशी केली. तेव्हा त्यांना कळून आलें कीं, सर्कस मद्रासवरून सिलोन मार्गानें जावा, सुमात्रा वगैरे बेटांकडे वळली होती. त्यामुळें त्या सर्कसला परत जाऊन मिळणें त्यांना अर्थातच शक्य नव्हतें. तेव्हा त्यांनीं त्या सुमारास म्हैसूरला आलेल्या ' ग्रँड इस्लाम सर्कस ' मध्यें प्रवेश केला. त्यानंतरहि त्यांचें अनेक सर्कशींमधून भ्रमण झालें.

अंगात तकवा आहे तोंवरच सर्कसचा धंदा, हें तत्व त्यांनीं ओळखलें होतें. म्हणून कसरतपटुसारख्या फिरत्या धंदेवाइकांना मोह घालणाऱ्या अनेक व्यसनाना बळी न पडतां त्यांनीं आपली ताकद आणि चारित्र्य हीं शाबूद राखलीं होतीं. तिशी उलटल्यावर अंगांत जसा ब्रोजडपणा येऊं लागला तसा त्यानीं धंद्याला रामराम ठोकला, आणि परत आपल्या गांवीं प्रयाण केलं. जवळ साचलेल्या पुंजींतून एक मळा विकत घेतला आणि आपल्या कष्टानें मिळवलेल्या अन्नाचे चार घास सुखानें खात बसून उरलेलें आयुष्य घालविण्याचा निर्धार केला.

त्यांनीं जमीन विकत घेतली त्याबरोबर एक श्राद्धहि विकत घेतलें आणि त्यासाठीं क्षणत बसण्याचा त्यांच्यावर प्रसंग आला. त्यांनीं विकत घेतलेल्या जमिनीच्या मूळ मालकाची आणि त्या जमिनीपलीकडे असलेल्या जमिनीच्या मालकाची सरहद्दीसंबंधीं भाऊबन्दकी होती. जमिनीच्या विक्रीसंबंधीं शेलारबरोबर वाटाघाटी सुरू झाल्या आणि शेलार ती जमीन खरेदी घेणार हें मुक्रर झालें तेंव्हा संधी साधून शेजारच्या जमीन-माल-

कानें आपला बांध सहासात हात शेलारांच्या जमिनींत सारला. सहासात हात रुंदीचा आणि सबंध मळयाच्या लांबीचा एक तुकडा शेजाऱ्यानें निष्कारण उपटला हें दिसून येतांच शेलारनीं त्या शेजाऱ्यास बऱ्या बोलानें तो तुकडा परत करण्यास सांगितलें पण तें कूळ अशा सांगीवांगीला बधण्यासारखें नव्हतें. अखेर शेलारना दिवाणी कोर्टाचा आश्रय करणें भाग पडलें.

स्टांप, पुरशिस, भत्ता, वकील फी, अशा अनेक जळवा त्यांच्या पुंजीला लागल्या. पण कागद त्यांच्या बाजूचे असल्यानें दाव्याचा अखेरचा निकाल त्याच्याच वतीनें होणार असा रंग दिसूं लागला.

त्यांच्या जमिनींत एक विहीर होती. ती दगडांनीं बांधून काढण्यास काय खर्च येईल यासंबंधीं त्यानीं एक " इष्टिमेट " करवून घेतलें. पण त्या " इष्टिमेटां "त दाखविलेला खर्च आपल्यास झेपण्यासारखा नाहीं हें पाहताच त्यांनीं ती विहीर पक्क्या विटानीं बांधवून घेतली. विहीर दगडांनीं बांधली गेली असती तर तींत पायऱ्याहि करतां आल्या असत्या पण विटांनीं ती बांधल्यामुळें पायऱ्या करतां आल्या नाहींत

यंदा गुळास भाव बरा असल्यानें शेलारना आपल्या उसाच्या फडाचें उत्पन्न बरें आलें. शेलारनीं जमीन खरेदी केली, विहिर बांधली, उंसाचें उत्पन्नहि त्यांना बरें आलें, या गोष्टी पाहताच त्यांच्या वाईटावर असलेल्या मंडळींच्या पोटांत दुखूं लागलें. त्यांतून दिवाणी दाव्याचा निकालहि शेलारच्या बाजूनें होणार हें पाहून तर त्या मंडळींचें पित्त अगदीं खवळून गेलें.

शेलारच्या प्रतिवादी नं. १ चें नांव गणपत मिसाळ. आमच्या गांवीं जे चार मिसाळ बंधु आहेत, त्यांच्यापैकीं सर्वांत वडील म्हणजे गणपत मिसाळ. चार भाऊ पण सगळे एका मुठीचे. त्यामुळें त्यांच्याकडे पाहण्याची सामान्य माणसाची छाती नव्हती. याचा साहजिक परिणाम असा झाला कीं, त्या बंधूंत गुंडगिरी शिरली. चार भाऊ एका दिलाचे

असल्यामुळें ही गुंडगिरी पचत चालली. शेजारच्या जमिनीवर त्यांनीं जें आक्रमण केलें होतें तें त्यांच्या या गुंडगिरीचेंच एक उदाहरण होतें. आणि इतर ठिकाणीं जशी आपली गुंडगिरी यशस्वी झाली तशी या कामींहि ती यशस्वी होईल असा त्यांचा कयास होता. पण ती गुंडगिरी पचली नाहीं आणि शेलारबरोबर त्या चौघा भावांनाहि प्रतिवादी म्हणून कोर्टांत उभे रहावें लागलें. दावा जिंकण्याकरितां त्यांनींहि खूप प्रयत्न केले. पण कागद त्यांच्या उलट बाजूनें बोलत असल्यामुळें पैशापरी पैसा जाऊन पदरीं अपयश येणार हें त्यांना कळून चुकलें. दाव्याच्या निकालासरशीं त्यांच्या गुंडगिरीलाहि चांगलाच पायबंद बसणार होता. उलट त्यांचा शत्रू शेलार मात्र छाती वर काढून गावांत मिरवणार होता!

आपल्या शत्रूला नामोहरम करण्यासाठीं मिसाळ-बंधु अनेक क्लृप्त्या योजूं लागले. पण कांहीं केल्यानें त्यांचा हेतु तडीस जाईना. अखेर गणपत मिसाळाला एक अजब युक्ति सुचली. पण ती तडीस नेण्यास मंजुळेचें सहाय्य अवश्य होतें. मंजुळा ही मिसाळ-बंधूंची एकुलती एक बहीण. अंगापिंडानें ती आपल्या चारी भावांस शोभण्यासारखीच होती. नाकाडोळ्यांनीं ती भारीच तरतरीत. शिवाय भावांपेक्षां रंगानें ती जास्तच उजळ असल्यानें ती रस्त्यानें चालली कीं तरुणांच्या माना वळून वळून मोडायच्या बेताला येत. ती आठ वर्षांची होती तेव्हां तिचं लगीन झालं होतं. पण लगीन झाल्यावर चार वर्षांनीं पटकीच्या सांथींत तिचं सौभाग्य हरपलं आणि ती माहेरीं परत आली ती कायमचीच. ऐन पंचविशींतील आजचं तिचं तारुण्य गांवांतल्या अनेक तरुणांना घायाळ करीत होतं.

त्या दिवशीं शेलार विरुद्ध मिसाळ खटल्याची तारीख होती. तारीख आटपून गणपत परत घरीं आला तो चमत्कारिक मनःस्थितींतच. ओटीवर बसल्यावर तर त्यानें शेलारवर शिव्यांचा भडिमार चालविला. मंजुळेनं गूळ-पाणी आणून दिलं पण गणपतचा राग थंड होण्याचं कांहींच लक्षण दिसेना.

## तंटा कसा मिटला ?

'हरामखोर! आमच्या घराण्याला भिकेला लावायचा इच्यार केलाय त्यानं!' गणपत म्हणाला.

'काय, झालं काय असं?' मंजुळेनं विचारलं.

'काय व्हायचं काय? दावा त्येच्यासारखा होणार आन् दाव्यापायीं त्येनं जो खरच केला त्यो बी आमच्याच टाळक्यावर बसणार! काय न्याय हाय जगांत? आमच्या घराण्याला माती चारायचा इचार केलाय् त्यानं! माज्याकड बगून हासत होता आज. असं वाटलं त्येच डोळंऽ काढून त्येच्याच हातावर ठेवावत! पण काय करूं?...'

मंजुळेच्या अंगांतलं मिसाळाचं रक्त गरम झालं. त्या भरांत शेलार आपल्या घराण्यावर निखारा ठेवायला तयार झाला आहे हें तिच्या भावाचं म्हणणं तिला खरं वाटलं.

'मग त्याची खोड मोडाया काय कराया व्होवं?' मंजुळा म्हणाली.

'एक युगत हाय. लई इच्यार करून म्या ती युगत काढलीया. पर ती तडीला जायला तुजी मदत व्होवी.'—गणपत.

'अस कशापायीं बोलतुयास दादा? अमुक एक गोष्ट कर म्हून तूं या मंजुळेला सांगायचं आन् म्या ती करायची. ततं असं आडपडद्याचं बोलनं कशापायीं?'

'ते खरं. पर तुला ती युगत पटायची न्हाई म्हून जरा आडपडद्यानं बोललों.'

'मग आतां सरळ बोल.'

'तूं त्येच्या हिरीवर पानी आनायला जायचा राबता ठेवायचा. त्येचा आमचा दावा असला तरी पान्याला त्यो काय 'न्हाई' म्हननार न्हाई. दुपारच्या येळला हिरीवरच्या आंब्याखालीं त्यो पडलेला असतोय्. धा–पांच येळला तूं पानी आनलंस कीं एक रोज असं करायचं–आम्ही चौघ भाऊ आन् त्येच्या इरुद्ध असलेलीं चारदोन मानसं मिळून आमच्या खोपींत बसतों. तूं रोजच्यापरमानं पानी आनायला म्हून जायचं, काय

बी निमित्तानं त्येच्याजवळ जायचं आन् एकदम आरडा–ओरडा करायचा. अब्रू घेतली म्हून आरडायचं. आम्हीं आमच्या झोंपडींत असतोंच. तुजं आरडणं ऐकलं कीं आम्ही येतों आन् त्येची हाडन्हाडं सैल करतों. फिरून वर फौजदारी फिरयाद ठोकतों. कसा सुटतोय् बघूंया."

'अरऽपन माजी अब्रू—'

'त्येच्या नुस्तं जवळ जायचं. त्येनं अंगाला हात लावायच्या अगुदरच आरडायचं. यांत अब्रू–बिब्रू काय घेऊन बसलीस? तुज्या अब्रूची तुलाच तिकती काळजी आन् आमास्नी न्हाई व्हय ?'

'पन ऽ —'

'पन--बिन काय नाहीं, त्वा इकतं काम करायलाच व्होवं.'

— आणि शेवटीं गणपतनं तिचा होकार वसूल केलाच.

दुसऱ्या दिवशीं दुपारीं मंजुळा डोकीवर घागर घेऊन शेलारच्या विहिरीवर आली. शेलारचे मोटवण आणि मंजुळेच्या भावांची जमिन याच्यामध्यें शेलारच्या उंसाचा फड होता. त्यावेळीं ऊंस चांगला वाढून पुरुष–दीड पुरुष झालेला होता. म्हणून शेलारच्या मोटवणावर काय चाललेलं आहे हें मिसाळांना आपल्या शेतांतून दिसण्यासारखें नव्हतें. मात्र त्या मोटवणावरून मिसाळांना हाक मारली कीं ती त्यांना ऐकूं जात असे.

शेलारच्या विहिरीवर एकदम दोन मोटा चालण्यासाठीं दोन चाकांची व्यवस्था केली होती. पण शेलारचा फड एका मोटेवरचाच असल्यानें दुसऱ्या चाकावर मोट नव्हती. म्हणून त्या चाकाचा उपयोग प्यायला पाणी ओढण्याकरतां केला जात असे.

मंजुळा आली ती सरळ त्या चाकाजवळ गेली. घागरीला फास लावून तिनें ती घागर विहिरींत सोडली. मोट केव्हांच सुटली होती. मोटेचे बैल आंब्याच्या झाडाखालीं विसांवा घेत होते. शेलार पाटांतलें पाणी धावेवर शिंपडीत होते. त्यांना मंजुळेकडे पाहिल्याखेरीज रहावेना.

चोळीच्या रेशीमकांठांनीं तिच्या दंडांना खूप ओढून धरण्याचा प्रयत्न केला होता. पण त्या प्रयत्नांना न जुमानणारे तिचे गोल दंड—उच्छृंखल तारुण्याचीं प्रतिकेंच होते ते !

' चाक फार जुनं झालय् तें. चांगलं चाक आम्ही मोटेला घातलंय् अन् जुनं चाक इकडं ठेवलंय्. एकाद्या वेळीं कणा मोडायचा त्या चाकाचा. मी काढून देऊं का ती घागर ? ' शेलार म्हणाले.

ते शब्द ऐकून मंजुळेनें एकदां त्याच्याकडे रागानें पाहिलें. त्या रागानें पाहण्यातहि शेलारना मोहकताच भरलेली दिसली. दयितांना आपल्या प्रिय विषयाची प्रत्येक कृति मोहकच दिसत नाहीं का ?

घागर डोकीवर ठेवून मंजुळा फडाच्या कडेनें आपल्या झोंपडीकडे चालली. शेलार कितीतरी वेळ तिच्या पाठमोऱ्या आकृतिकडे पहात उभे होते.

दुसऱ्या दिवशीं दुपारच्याच वेळेला मंजुळा फिरून पाणी नेण्यासाठीं विहिरीवर आली. ती आलेली दूरवर पाहातांच शेलार हातांत एक कुऱ्हाड नी एक लहानसें लाकूड घेऊन विहिरीकडे आले.

' थाबा, त्या चाकाचा कणा दुरुस्त करून देतों. '—शेलार.

' काय नको कणा दुरुस्त करायला. होऊं द्या कायबी आमचं ! ' रागाच्या आविर्भावानें मंजुळा म्हणाली.

गणपतदादाच्या युक्तिप्रमाणें ओरडायला ही किती नामी संधि होती !— पण त्यावेळीं गणपतदादा आणि जरूर ते दुसरे लोक हेच पलीकडे नसल्यामुळें त्या नामी संधीचा कांहीं उपयोग नव्हता.

लटक्या रागातच मंजुळेनें झर्रकन् घागरीला फांस लावला, भर्रकन् ती घागर आंत सोडली, झटकन् हिसडा देऊन ती भरली अन् खटकन् ओढायला सुरवात केली तोंच—

कड्ड्ड्–कड्...

धब्ब— !

चाकाचा कणा मोडला. घागर ओढणारें माणूस घागरीसहीत विहिरींतल्या पाण्यांत गडप झालें.

शेलारनीं धांवत जाऊन आपल्या झोपडींतला कासरा आणला. त्याचें एक टोक चाकपट्टीला गच्च बांधून ठेवलें, दुसरें टोक पाण्यांत टाकलें आणि धाडकन् आंत उडी घेतली.

एकाच मिनिटांत ते मंजुळेला आपल्या हातावर घेऊन जलपृष्ठावर तरंगूं लागले.

एकवार, गणपत मिसाळाला हाक मारावी असं त्यांच्या मनांत आलं. पण तत्क्षणीं, ती हांक त्याला ऐकायला जायची नाहीं हेंहि त्यांना दिसून आलं. शिवाय गणपत मिसाळाची मदत घ्यायला त्यांचा मानीपणा कुठे तयार होता ?

त्यांनीं चाकपट्टीवरून लोंबणारा कासरा गांठला. मंजुळेचा गोड भार खांद्यावर टाकून त्यानीं कासऱ्याला हात घातला. मंजुळा अद्याप बेशुद्ध स्थितींतच होती.

दोराला धरून चढण्याचे त्यांचे पहिले एक दोन प्रयत्न अयशस्वी झाले. ते हट्टाला पेटले. 'ॲक्रोबॅट शेलार' चें 'भूत' त्यांच्या अंगांत संचारलें. तंबूंत खेंचून भरलेला प्रचंड जनसम्मर्द त्यांच्या मनःचक्षूंना दिसूं लागला. बॅंडचें उन्मादकारी संगीत त्याच्या कर्णपथांवर आदळूं लागलें. पहिल्या बारवरून तिसऱ्या बारवर झेप घालणारा धाडशीपणा त्यांच्या नसानसांतून नाचूं लागला. झुल्यावरच्या अवघड कामांत प्रगट झालेला तोल नी संयम आतां पुन्हा प्रगट होऊं लागला. अक्रोबॅट शेलार सरसर वर चढूं लागले.

आंब्याच्या झाडाच्या सावलींत मंजुळेला निजवून अगोदर त्यांनीं तिच्या पोटांतलें पाणी बाहेर काढलें. थोड्या वेळांत ती शुद्धीवर आली. आपल्या स्थितीचा तिला उमज पडला. आपल्याला जीवदान देणाऱ्या मर्द पुरुषाकडे तिनें एकदां कृतज्ञबुद्धीनें पाहिलें. मग परत डोळे मिटून घेतले.

## तंटा कसा मिटला ?

त्या दिवशीं मंजुळा पाणी घेऊन आली पण आपलें हृदय मात्र मागें ठेऊन आली. आपल्या ' युगती ' ची मुख्य मेढच ढासळल्यामुळें गणपत मिसाळाचा नाइलाज झाला. शेलारनीं खटला काढून घेण्याचें मान्य केलें. मिसाळानीं पाहिलें कीं, खटल्याच्या निकालाची वाट पाहिली असती तर आपण आक्रमिलेली जमिनच्या जमीन जाऊन वर भूर्दंड भरावा लागला असता; त्यापेक्षा आक्रमिलेली जमीन गेली आणि भूर्दंड भरावा लागला नाहीं तरी तो आपला फायदाच आहे. त्या दिवसानंतर मंजुळा त्या मळयात आली ती मळयाची मालकीण म्हणूनच आली. शेलार विरुद्ध मिसाळ खटल्यात तडजोड घडून आली आणि तंटा निकालात निघाला.

' झारापकर '—फेब्रुवारी १९४०

---

## अतृप्त वात्सल्य : १३

दिवाळीची सुटी असल्यामुळें मी मामांच्याकडे आलों होतों. आमच्या कॉलेजला सुटी महिनाभर असलीतरी मामांच्या कचेरीला आठवडाभरच सुटी असते. मी त्यांच्याकडे आलों तेव्हां कचेरीला सुटी झाली नव्हती.

दुपारच्या वेळीं मामा कोर्टात गेले कीं मीं त्यांच्या खोलींतील कपाटांतील पुस्तकें काढी आणि तीं चाळीत बसें. मामांना पुस्तकांचा मोठा नाद आहे. आपल्या धंद्यास लागणाऱ्या कायद्यांच्या पुस्तकांचा त्यांचा संग्रह तर मोठा आहेच पण वाङ्मयविषयक, मानसशास्त्रविषयक, अशा इतर ग्रंथांचाहि संग्रह मोठा आहे.

पांचचा सुमार होता. वास्तविक मामा कोर्टांतून यापूर्वींच परत यायचे. पण त्या दिवशीं ते पांच वाजून गेले तरी आले नव्हते.

बाहेरून कुणीशी हांक मारली—' वकीलसाहेब !–' मी दार उघडलें.

' वकीलसाहेब अजून कोर्टातून परत आले नाहींत. ' मी म्हणालों.

' केव्हां यायचे आहेत ? '

' यायची वेळ झाली त्यांची. येतील इतक्यांत. '

' मग जरा वाट बघत बसतों तर. ' असें म्हणत तो गृहस्थ आंत आला आणि खोलींत मांडलेल्या खुर्च्यांपैकीं एकीवर न बसतां खालीं आंथरलेल्या जाजमावर बसला.

मी त्याच्याकडे थोडें लक्षपूर्वक पाहिलें.

घरंदाज मराठा घराण्यांतील दिसत होता तो. वय सत्तराच्या घरां-तलें. उष्मा होत होता तरी त्यानें कोट-जाकीट चढविले होते आणि तेहि लोकरीचे ! कोटावरून रेशीमकांठी धोतर खांद्यावर टाकलेलें. पांढऱ्या पण भरपूर मिशा. कानांत टपोऱ्या मोत्यांची भिकबाळी. गृहस्थाची उंची सहा फुटाच्या वरच थोडीशी. नेसतें धोतर किंचित् कावेच्या रंगाचें. हातात चांदीच्या मुठीची जाडजूड काठी. कपाळावर बुक्क्याचा टिळा. माथ्यावर गुलाबी फेटा. पण समला पाठीवर सोड-लेला नसून तो माथ्यावरच खोंवलेला.

दोन तीन मिनिटें पूर्ण शांतता होती.

त्यानंवर त्यानें खिशातून पानाची चंची बाहेर काढली आणि चुन्याच्या डबींतून आंगठ्यानें पानाच्या मागील बाजूस चुना फांशीत त्यानें मला विचारलें—

' आपुन वकीलसाहेबाख्नी कोण लागता ? '

' भाचा. '

' काय करता आपुन ? '

' पुण्याला कॉलेजांत असतो. '

' कालिजांत असतां ? ' त्यानें आपली नजर माझ्यावर रोखली.

मला त्याचें ते पहाणें थोडें चमत्कारिक वाटलें आणि मी आपल्या

जागेवरून उठून पुस्तकाच्या कपाटाकडे गेलों.

' आपल्याकड जरा डोळे भरून पाह्यलं म्हणून आपणास्नी राग आला नाहीं ना ? माजं जरा ऐकून घ्याल तर आपुन रागावनार नाहीं अशी खात्री आहे मला. '

मी परत त्याच्यासमोर येऊन बसलों.

' मला बी एक मुलगा होता. थेट आपल्या शिणेचा. आतां असता तर त्योबी कालिजांत असता ! '

आणि चटकन् त्यानें खांद्यावरच्या धोतराचें रेशीमकाठ आपल्या डोळ्यांस लावले.

मला वाईट वाटलें. उत्सुकताहि जागृत झाली.

' कशानं गेला तुमचा मुलगा ? ' मी विचारलें.

' दोषी तापानं. पंधरा दिवस तापानं फणफणलं पोर. डोळ्यास डोळा लागला नाहीं आमच्या. वैद्य–डाक्तर पुष्कळ केल पण काय उपयोग झाला नाहीं. आमचं नशिबच खोटं—तिथं वैद्य–डाक्तर काय करनार ! '

' किती दिवस झाले त्याला जाऊन ? '

' झाली दोन वर्स. '

' तुम्हाला दुसरीं मुलंबाळं कांहीं ? '

' तेव्हढी कुठली आली आमची पुण्याई ! होता एकच दिवा--त्योबी इझला ! '

' अरेरे ! '—

मी दयार्द्र दृष्टीनें त्याच्याकडे पाहूं लागलों. एकुलता एक मुलगा. हाता–तोंडाला आलेला. आणि अशा म्हातारपणीं तोहि जावा ! किती दुर्धर प्रसंग हा !—

घड्याळांत साडे–पांचाचा ठोका पडला.

' साडेपांच वाजल–आन् वकीलसाहेब अजून बी आल नाहींत ! मी जातों आतां. उद्यां सकाळीं भेट घेईन त्यांची. '

म्हातारा निघून गेल्यावर थोड्याच वेळांत मामा घरीं आले.

‘ एक गृहस्थ आला होता तुमच्याकडे. ’ मी म्हणालों.

‘ कोण ? ’

‘ नांव विचारायचं विसरलों—पण वर्णन सांगतों हवं तर.’

मी त्याचे वर्णन केलें.

‘ बाळासाहेब जाधवराव असतील ते येतील उद्या सकाळीं. नेहमींचेच पक्षकार आहेत ते.’

चहा घेऊन झाल्यावर मी म्हणालों—

‘ मोठे दुर्दैवी गृहस्थ आहेत बिचारे ! ’

‘ दुर्दैवी ? कशावरून ? ’—मामा.

‘ म्हणजे ? दोन वर्षांपूर्वी त्याचा एकुलता एक मुलगा गेला नाहीं का ? ’—मी.

मामा एकदम हसायलाच लागले.

आश्चर्य वाटलें मला.

‘ तुमच्या हंसण्याचा अर्थ नाहीं मला कळला. ’—मी.

‘ अरे, त्याना मुलगा असला तर तो जाईल ना ! ’

आश्चर्याचा दुसरा धक्का.

‘ पण आपल्या मुलासंबंधीं बोलताना डोळ्यात आसव उभीं राहिलीं त्याच्या. कसलीं आसवं हीं ? खोटंच का हे सारं ?’

‘ खोट असं म्हणत नाहीं मी. कारण खोटं—नाटं कांहीं कराव अशी त्याची वृत्तिच नाहीं. ’

‘ त्यानी खोटंहि केलं नाहीं म्हणता आणि त्याना मुलगाहि नाहीं म्हणता— मग याचा उलगडा कसा करायचा ?’

‘ त्यांना मुलं झालीं नाहींत पण मुलं असावींत ही त्याची इच्छा मात्र काहीं नाहींशी झाली नाहीं. अपत्यसुखाची इच्छा ही जन्मतःच माणसाच्या ठिकाणीं असते. कांहीं व्यक्तींच्या आयुष्यांत ही इच्छा प्रत्यक्ष



7

सफल होऊं शकत नाहीं. तेव्हां तीं माणसं अप्रत्यक्ष रीतीनें आपल्या इच्छेची पूर्तता करूं लागतात. कुणी दुसऱ्याच्या मुलावर ममता करूं लागतात ; कुणी कुत्रीं—मांजरें पाळून त्यांवरच अपत्यप्रेमाची भूक भागवितात. जाधवरावांच्या काल्पनिक मुलाच्या मृत्यूबद्दल तूं जी सहानुभूति दाखविलीस त्या मुळें मनांतून त्यांना आनंदच वाटत असला पाहिजे. अपत्यप्रेमाचा आनंद अनुभवण्याची ती एक विचित्र तऱ्हा होती त्यांची. अपत्यप्रेमाची भूक शमन करण्याकरतां माणसं किती चमत्कारिक उपाय योजतात याचं मॅक्डूगल किंवा फ्रॉइड् नामक मानसशास्त्रज्ञानं कुठेंतरी सुंदर वर्णन केलेलं आहे. थाब हं. तें पुस्तकच दाखवितों तुला.'

मामा कपाटाजवळ गेले आणि पुस्तकें चाळूं लागले.

मी खिडकींतून बाहेर रस्त्याकडे पाहूं लागलों. रस्त्यावरून कितीतरी माणसें चाललीं होतीं. त्यांचीं मनें—

किती विलक्षण असतात मानवी मनें !

ता. २ आक्टोबर १९३९. —अप्रकाशित.

---

# पाहुणचार : १४

अखिल हिंदुस्थानचा प्रवास पायीं करण्यासाठीं म्हणून घराबाहेर पडलेला तो एक प्रवासी होता.

फिरतां फिरतां एके दिवशीं संध्याकाळीं तो एका खेडेगावीं येऊन पोंचला.

त्या गांवीं वस्तीस राहणें त्याला जरूर होतें. तेव्हां जेवणाची आणि राहण्याची सोय कुणाकडे होईल याबद्दल तो त्या गावांतील लोकांजवळ चौकशी करूं लागला.

सर्वांनीं त्याला जीं उत्तरें दिलीं त्यावरून त्यानें अनुमान काढलें कीं गावचे पाटील फार उदार आणि पाहुणचाराच्या कामीं तत्पर असे गृहस्थ आहेत, तेव्हां त्यांच्याकडेच आपली सोय होईल.

तो पाटीलबावांच्या घरीं गेला.

पाटीलबावांनीं त्याचा आदरसत्कार केला. त्याच्या खाण्या–राहण्याची उत्तम सोय केली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं पाटीलबावांनीं आग्रह करून त्याला आपल्या शेतावर नेलें.

' पाहिलीत ही आमची बैलजोडी. अशी बैलजोडी तुम्हाला कुठेच पहायला मिळाली नसेल ! ' पाटील अभिमानानें म्हणाले.

' छे हो ! यांच्यापेक्षां कितीतरी अधिक सुंदर बैल माझ्या पाहण्यांत आलेले आहेत.' पाहुणा म्हणाला.

' हें पीक कसं काय वाटतं तुम्हाला ? आमचा तर असा अंदाज आहे कीं बिघ्याला खंडी जोंधळे तरी व्हायलाच पाहिजेत. ' पाटील म्हणाले.

' बिघ्याला खंडी म्हणजे कांहीं फार नाहीं. बिघ्याला दीड खंडी जोंधळे झालेलीं अनेक शेतं माझ्या पाहण्यांत आलेलीं आहेत. ' पाहुणा म्हणाला.

' बरें, ही आमची फुलबाग कशी काय वाटते तुम्हाला ? ही तयार करायला आम्हाला फार कष्ट पडले. ' पाटील म्हणाले.

' परवां मी त्या–ह्यांची बाग पाहिली. किती नामी होती म्हणता ! त्या बागेपुढें ही कांहींच नाहीं. ' पाहुणा म्हणाला.

आतां मात्र पाटलांच्या सहनशक्तीची मर्यादा संपली. ते गरम झाले. त्यांनीं आपल्या नोकराला हांक मारली—' नाऱ्या ! '

नाऱ्या धावत पुढें आला.

' हे पाहुणे वेडपट दिसताहेत. याना हाकलून दे पाहू अगोदर. ' पाटील गर्जून म्हणाले.

नाऱ्यानें पाहुण्यांना यथेच्छ पाहुणचार चारून शेताबाहेर पिटाळून लावलें.

पाय ओढीत चाललेल्या त्या प्रवाशाच्या मनात आलें:—' मी खरं बोलायला गेलों तर मला हा पाहुणचार मिळाला ! खऱ्याची दुनिया नाहीं हेंच खरं...... पाहुणचाराच्या मोबदल्यांत यांच्या सगळ्या गोष्टींची मी तोंड फाटेपर्यंत स्तुति करावी अशी इच्छा होती म्हणायची यांची. काय उदारपणा ! काय पाहुणचार !!—'

ता. २६।१२।३९. —अप्रकाशित.

# जबाबदारीची जाणीव : १५

प्राथमिक शाळेंत जाणाऱ्या एखाद्या मुलाला आपण प्रश्न केला कीं—'बाळ, मुंबईची प्रसिद्धी कशाबद्दल आहे ?'—तर तो चटकन् उत्तर देईल 'कापसाच्या गिरण्यांबद्दल.'

भूगोल—पत्रकें लिहिणाऱ्या लेखकांनीं मुंबईबद्दल अशा प्रकारची माहिती देऊन मुंबई शहराचा खरोखरी मोठा अपराध केला आहे. कारण आमच्या मुंबई शहराची प्रसिद्धि इतर किती तरी गोष्टींबद्दल आहे. मुंबईचे खिसेकापू, मुंबईचे दिवाळखोर, मुंबईचीं इराण्यांचीं हॉटेलें, मुंबईतले दंगे, मुंबईतले अपघात, मुंबईतले रोग—अशा किती तरी गोष्टी आहेत कीं भूगोलपत्रकांत त्यांचा मागमूसहि नाहीं !

निदान मुंबईतल्या ऑफिसांचा तरी उल्लेख यायला कांहींच हरकत नव्हती. कारण गिरण्यांचा उल्लेख आल्यावर ओघानेंच ऑफिसांची

आठवण व्हावी, एवढें त्या दोन्हींत खास साम्य आहे. दोन्हींमध्यें अर्ध-पोटी लोक जिवापाड खपत असतात. दोन्हीमध्यें दररोज कामाचे ढीग पडत असतात. मालक—नोकरांचे प्रेमाचे संबंध [ ! ] दोन्ही ठिकाणीं सारख्याच प्रमाणांत पहायला मिळतात...

संध्याकाळचा सहा—साडेसहाचा सुमार होता. इकडे ऑफीसांतून पांढरपेशा मजूर मंडळी [ अर्थात् कारकून, म्हणजेच 'साहेब' ] मोकळ्या अंगानें [ कीं रित्या पोटानें ] आणि घरीं जाण्याच्या भारावलेल्या आतुरतेनें बाहेर पडत होती. चर्चगेटकडून चर्नीरोड आणि दादरकडे जाणाऱ्या लोकल्स चिकार भरून चालल्या होत्या.

आणि तिकडे त्या कारकुनमंडळींची 'मंडळी—'

—आमच्या पुरुषवर्गानें बायकांना चुलीशीं जखडून टाकलं आहे असें जे कुणी म्हणतात तें साफ खोटं आहे, असं आतां माझं पक्कं मत झाल आहे. कारण कारकूनमंडळींची 'मंडळी' चुली फुंकीत बसलेली होती असं जर म्हटलं असतं तर तें वस्तुस्थितीला कितीसं धरून झालं असतं?

—निदान सुशिलाबाईच्या बाबतींत तरी आमचं विधान साफ खोटं ठरलं असतं. कारण त्या चुलीशीं मुळींच बसल्या नव्हत्या—नव्हे, अजून त्यांनीं मुळीं चूलच पेटविली नव्हती. आणि पेटवून उपयोग तरी काय होता ? घरीं तांदूळ कुठे होते चुलीवर ठेवायला ? तेव्हां त्या आपल्या खुशाल स्वयंपाकघर सोडून बाहेर गॅलरींत येऊन उभ्या राहिल्या आणि तिथून खालीं रस्त्यावरून चाललेल्या अथांग जनसमूहाकडे उगीचच पहात उभ्या राहिल्या.

तोंच जिन्यावर पावलें वाजलीं. कुणी तरी पांचसहा माणसें वर येत असावीत. सुशिलाबाईना आश्चर्य वाटलें. या वेळीं त्या 'एकाच' माणसाच्या आगमनाची अपेक्षा करीत होत्या. ते 'माणूस' येतांच त्याची खूप खूप हजेरी घेण्याचा निश्चय त्यांनीं मनांतल्या मनांत शंभरदां तरी केला होता. आणि आतां तें 'माणूस' एकटेंच न येतां—

जनार्दनपंतांबरोबर आलेली पांचसहा मंडळी मोठ्या खुषींत असलेली दिसत होती. त्या मंडळींना पहातांच सुशिलाबाई झटकन् आंत गेल्या. तिरस्काराची एक चमत्कारिक छटा त्यांच्या चर्येवर दिसूं लागली. या मंडळींचें आगमन म्हणजे कोणत्या गोष्टींचें सूचक, हें त्यांना पुरें माहीत होतें. चहा, पोहे, शिरा, भाजी...आणि घरीं तर ठणठणपाळ ! काय करावें बिचारीनें ?—तोंच त्या पांचसहा जणांपैकीं एक लोंचट गृहस्थ म्हणतात, 'वहिनी, ऐकलंत का ? तुम्हांला पुढच्या महिन्यापासून दोन रुपये प्रमोशन मिळावं अशी ऑर्डर झालीय् आज. तेव्हां आज चहा हवाय् ! म्हणून आलों आहोंत आम्ही. हो,—नुस्ताच चहा नव्हे बरं का. चहा, पोहे, शिरा, भाजी,...दोन तास लागले तरी हरकत नाहीं. तितका वेळ बसून रहायची तयारी आहे आमची.'

चहा ! पोहे ! शिरा ! भाजी ! प्रमोशनच्या बातमीनें आनंद वाटण्याच्या मनःस्थितींत नव्हतीच ती बिचारी ! दुधवाल्या भय्याचे पैसे पोंचले नाहींत म्हणून आजच त्याने दूध बंद केलें होतें; वाण्याचें बिल थकलें म्हणून त्यानें सामान देण्याचें नाकारलें होतें; आणि घरभाडें भागविण्याची नोटीस तर नुक्तीच येऊन थडकली होती !

वास्तविक जनार्दनपंताची स्थिति इतकी ओढघस्तीची असायला कांहीं सबळ असें कारण नव्हतेंच. पन्नास रुपये पगार मिळत होता त्यांना. आणि संसार म्हणाल तर फक्त राजा—राणीचा. व्यसन म्हणाल तर तेंहि त्यांना कोणतेंच नव्हतें. त्यांची चूक एवढीच होती कीं, संसाराच्या जबाबदारीची जाणीव त्यांना कधींच होत नव्हती. आणि या वस्तुस्थितींत त्यांच्या दिलदारपणाची भर पडल्यामुळें त्यांच्या संसाराला अशी फाटकी कळा आली होती. वडिलांच्या हयातींत संसाराच्या जबाबदारीची झळ त्यांना चुकूनसुद्धां लागली नाहीं. सुदैवानें त्यांना पत्नीहि कोंड्याचा मांडा करणारी अशीच लाभल्यामुळें वडिलांच्या कष्टाच्या उबेवर त्यांच्या पश्चात् एकदोन वर्षांपर्यंत पंतांना संसाराची जबाबदारी म्हणून कांहीं पदार्थ

असतो अशी जाणीवहि झाली नाहीं. ऑफिसांत काम करावें, स्नेही मंड-ळींत गप्पा माराव्यात, खेळावें, खावें, प्यावें, स्नेह्यांच्याहि खाण्या-पिण्याचीं बिलें भरावींत, सिनेमाला जावें आणि जातांना एकदोन स्नेही स्वतांच्या खर्चानें बरोबर न्यावेत—असा त्यांचा थोडक्यांत जीवनक्रम होता. त्यामुळें महिना अखेरीस कचेरींत पगाराचे पन्नास रुपये त्यांच्या हातीं पडले तरी घरीं येईपर्यंत त्यांतली निम्मी—अधिक रक्कम उडून गेलेली असायची. अशा वागण्यानें वडिलांच्या कष्टाची ऊब तरी किती दिवस तग धरणार ?

—इच्छेविरुद्ध कां होईना पण अखेर सुशिलाबाईना स्टोव्ह पेटवून चहाचें आधण ठेवणें भाग पडलें. घरीं होती नव्हती ती साखर त्यांनीं आधणांत घातली आणि दूध मागून आणण्यासाठीं त्या मागील गच्चीनें बाजूच्या बिऱ्हाडांकडे वळल्या. त्या वेळीं शरमेनें त्यांना आंतल्या आंत मेल्यासारखें झालें होतें. पण त्यांच्या मानीपणांत चुकून कुठें धुगधुगी राहिली असल्यास तीहि निघून जावी म्हणून कीं काय कोण जाणें, पहिल्या एकदोन बिऱ्हाडांतील बायकांनीं त्यांच्या हांकेला मुळीं 'ओ'च दिली नाहीं. त्या बायकांना माहीतच कीं यांच्या घरीं पांचसहा माणसें आलीं आहेत तेव्हां चहाचें आधण चढणारच, आणि चहाचें आधण चढलें कीं सुशि-लाबाई दूध, चहा किंवा साखर काहींतरी मागायला येणारच. तेव्हां अगोदरपासूनच दक्षता घेऊन त्यांनीं सुशिलाबाईची ब्याद बाहेरच्या बाहेरच घालवून दिली. शेवटीं त्यांना एका नवीन बिऱ्हाडांत दूध मिळालें आणि चहाचा समारंभ उरकला. एका गृहस्थाचा अपवाद सोडला तर उरलेले गृहस्थ शिरा आदिकरून पदार्थ तयार होईपर्यंत वेळ घालविण्यास तयार नसल्यामुळें त्या पदार्थांचा बेत आपोआपच रद्द झाला आणि धूम्रपान—पानसुपारी होऊन मंडळी निघून गेली.

मंडळींना जिन्यापर्यंत पोंचवून जनार्दनपंत आंत येतात तोंच संतापानें तप्त झालेल्या सुशिलाबाई धांवूनच त्यांच्या अंगावर आल्या. क्षणभर वीज कडाडणार असा भास झाला. पण—पण विजेचा कडकडाट न होतां

एकदम वृष्टीलाच सुरवात झाली. बायकांच्या रागाची तप्तता तप्त अश्रुबिंदूनींच प्रकट व्हावी असा तर विधात्याचा संकेत नसेलना ?--

'माझा असा छळवाद कां मांडला आहे तुम्ही ?'

'कसला छळवाद ?'

'घरीं कांहीं म्हणजे कांहीं नसतांना असे पाहुणे घेऊन कां येतां ?'

'कांहीं नाहीं ?--कांहीं कसं नाहीं ?'

'कधीं कांहीं आणलंय् ?'

'पण आणायला पैसे दिले होते.'

'किती ?'

'वीस.'

'विसांत काय काय करायचं ? वाण्याचे पैसे द्यायचे, कीं घरवाल्याचे कीं दूधवाल्याचे ?'

'वीस पुरत नाहींत का ?'

'कसे पुरतील ?'

'या महिन्यापासून जास्त देईन, बरं का ! असा त्रास करून कां घ्यावा ! मागेंच कां मला सांगितलं नाहींस ? मी ऐकत नसलों तर माझे कान धरून ऐकवायचं होतंस मला. बायकांचा फाजिल सोशिकपणा शेवटीं त्यांनाच भोंवत असतो.'

गोड शब्दांनीं बायकांच्या रागाचें पाणी करून टाकण्याची ही युक्ति अनादिकालापासून पुरुष उपयोगांत आणीत आहेत.

--त्यानंतर चार दिवसांनीं जनार्दनपंतांचा पगार व्हावयाचा होता. पगार पोंचल्याबद्दल सही करीत असतां पंताच्या डोक्यांत एकच विचार घोळत होता.--'बस्स ! या पगारांतले पस्तीस रुपये तरी सुशीलेच्या हातीं द्यायचेच !--'

पगार घेऊन ते ऑफिसच्या बाहेर पडतात न पडतात तोंच चपराशानें सलाम ठोकला.

'साहेब, प्रमोशनबद्दल पोस्त?'

'साहेबांनीं खिशांत हात घातला. हातास एक अधेली लागली. दिली तशीच त्या शिपायाच्या हातावर ठेवून. साहेब ना ते!

एकदोन मिनिटांतच त्यांच्या समव्यवसायी मंडळींनीं त्यांना गराडा घातला. या कारकून मंडळींत एरवीं कितीहि मतभेद असले आणि उखाळ्या पाखाळ्या निघत असल्या, तरी एखाद्याला 'बनवायचा' असला कीं या मंडळींचें हां हां म्हणतां एकमत होतें.

नंतर इराण्याचें दुकान, सिनेमा, हातउसने घेतलेल्या पैशांची परत-फेड, वगैरे गोष्टी आटोपून पंत घरीं परत आले; तेव्हां त्यांच्या खिशांत अवघे वीसच रुपये शिल्लक होते!

त्याच दिवशीं नव्हे तर पुढेंसुद्धां कित्येक पगाराच्या दिवशीं या ना त्या कारणामुळें–निदान परत–फेडीच्या निमित्तानें पंताजवळ पगारांतल्या वीस रुपयांपेक्षां जास्त रुपये कधींच शिल्लक राहिले नाहींत.

इकडे सुशिलाबाईच्या हालांत आणखी एका नवीन काळजीची भर पडली. त्यांच्या संसारांत एका नवीन जिवाची भर पडायची होती. अशा दिवसांत आपल्या भावी अपत्याच्या जीवन–पटाशीं मधूनमधून खेळण्याचा एक छंदच बायकांना लागलेला असतो. त्या चिमुकल्या जीवाचा जीवन–पट सुशिलाबाईंच्या नजरेसमोरून सरकला, कीं चटकन् त्यांच्या डोळयांस पाणी येई. त्यांच्या फाटक्या संसारांत त्या अभागी जीवाचे कसले लाड पुरवले जायचे होते! बिचाऱ्याला पोटभर दूध मिळेल कीं नाहीं याचीच जिथें वानवा, तिथें लाड पुरविण्याची गोष्ट तर दूरच! अशा तऱ्हेचे विचार त्यांच्या मनांत आले कीं त्यांचा जीव अस्वस्थ होई, कावरा–बावरा होई.

एके दिवशीं सुशिलाबाईंचे वडील त्यांना माहेरीं घेऊन जाण्यासाठीं म्हणून आले. माहेरीं जायचें म्हणून आनंद व्हावा तर लगेच घर सोडून जायचें म्हणून वाईट वाटावें, असा पाठशिवणीचा खेळ चालला होता

त्यांच्या मनांत. त्यांतून पंतांचा स्वभाव तर असा छांदिष्ट. बाहेर पडले तर घरची शुद्धहि रहायची नाहीं. आणि सुशिलाबाई घरीं होत्या तोंपर्यंत घरची कांहीं तरी ओढ त्यांना असायची–कांहीं तरी दाब त्यांच्या मनावर असायचा. आतां त्याहि माहेरीं निघून गेल्या, कीं राजश्रींना दाही दिशा मोकळ्या! वाटेल तिथें जेवतील, नाहीं तर अजिबात जेवायचे नाहीत; वाटेल तेवढीं जाग्रणें करतील नाहीं तर दहादहा वाजले तरी उठायचे नाहींत. चहा घेतला घेतला--नाहीं नाहीं. आघोळ केली केली--नाहीं नाहीं. आणि शेवटीं व्हायचं काय तर आजारी पडायचे!

हीं सगळीं दृश्यें सुशिलाबाईच्या मनःचक्षूंसमोर नाचूं लागलीं, कीं त्यांच्या हळव्या नी प्रेमळ जिवाचें रान होई. आणि काहीं झालें तरी घर सोडून जायचें नाहीं असा निर्धार त्यांच्या मनान घुमूं लागे.

पण त्या निर्धाराचा काय उपयोग होता? शेवटीं आई जगदंबेवरच पतिराजांचें संरक्षण करण्याची जबाबदारी टाकून त्याना माहेरीं जावें लागलें.

त्या जातांच त्यांच्या मनःचक्षूंसमोर जीं दृश्यें दिसत होतीं तीं प्रत्यक्ष सृष्टींत दिसूं लागली. पंतांच्या अनिर्बंध जीवनाचा स्वैर–संचार सुरू झाला. स्त्रीला कुणी शृंखलेचीं उपमा देतात पण पंतांसारख्या लोकांच्या जीवनांत तरी या शृंखलेचे पुष्पहारांतच परिवर्तन झालें असावें असें वाटूं लागतें.

   

अशा स्थितींत दोन महिने गेले, त्यानंतर एके दिवशीं पंतांच्या श्वशुराकडून पंतांना पुत्ररत्न झाल्याचें पत्र आलें.

पत्र वाचीत असतां कसली तरी अननुभूत भावना आपल्या हृदयांत डोकावीत आहे असें त्यांना वाटलें. त्या भावनेचें त्यांचें त्यानांच आश्चर्य वाटलें. त्यांची विचारशक्तीहि खडबडून जागी झाली.

आणि तीन महिन्यानंतर एके दिवशीं सुशिलाबाई बाळासह परत आल्या. घरांत पाऊल टाकतांच त्यांना आश्चर्याचा धक्का बसला. घरा-

मध्यें इतकी शिस्त असेल, सामान-सुमान भरलेलें असेल अशी त्यांना स्वप्नांतहि कल्पना आली नसती.

'हें काय? एवढी शिस्त घरांत कुठून आली?'

'कुठून कां येईना, यात एवढं आश्चर्य वाटण्यासारखं काय झालं? ही शिस्त पाहून तुला इतकं आश्चर्य वाटलं, मग—'

पंतांनीं कपाटांतल्या पुस्तकांच्या रांगेमधून पोस्टल सेव्हिंग्ज बँकेचें पुस्तक काढलें आणि तें पत्नीसमोर टाकलें.

सुशिलाबाईनीं तें उघडून पाहिलें...

पंतांच्या नांवावर नव्वद रुपये जमा होते!

'हें काय!!'

'रक्कम कांहीं तितकीशी मोठी नाहीं.'

'रकमेबद्दल नाहीं म्हणत, पण आपल्या हातून हें झालं कसं?'

'त्यांत असं काय मोठं अवघड होतं?'

'अवघड नव्हतं, तर पूर्वी कसं झालं नाहीं?'

'पूर्वी माझ्यांत एक मोठा दोष होता.'

'कोणता?'

'जबाबदारीची जाणीव नसणं हा.'

'मग हा दोष कशामुळं गेला?'

'याच्यामुळं—' पंतांनीं पाळण्यांत खेळत पडलेल्या बाळराजाकडे बोट दाखविलें.

सुशिलाबाईंचे डोळे खुदकन् हासले. त्या झट्कन् पाळण्याजवळ गेल्या, अन् पटकन् त्यांनीं बाळराजाचा पापा घेतला.

'यशवंत'—सप्टेंबर—१९३९

---

# आमचे हक्क! : १६

बायका म्हणजे पुरुषांच्या सत्तेचे गुलाम, असं मत या दिवसांत कोणी प्रतिपादन केलं तर त्याची वेड्यांतच गणना होईल. पुरुषांच्या बरोबरीचे हक्क मिळविण्याचे स्त्रियांचे प्रयत्न सर्वविश्रुतच आहेत आणि त्यांच्या त्या प्रयत्नांना बरेंचसं यशहि आलेलं आहे. मी तरी त्यांच्या प्रयत्नांना याहून जास्त यश यावं असं इच्छिणाऱ्यांपैकींच एक आहे. पण कित्येक ठिकाणीं समान हक्काचीहि भाषा बाजूस राहून बायकोनें नवऱ्याचे सारे हक्क हिरावून घेतलेले आहेत आणि नवऱ्याला आपल्या सत्तेचा गुलाम करून टाकलेला आहे असं दृश्य पहावयास मिळतं तेव्हां वाटतं कीं—

हें तत्त्वज्ञान आठवण्याचं कारण इतकंच कीं, माझं आणि शामरावांचं या बाबतींत नुकतंच थोडं बोलणं झालं आणि संभाषणाच्या ओघांत शाम-

रावांनीं आपली हकीगत सांगितली. ते म्हणाले—

' माझा मूळचा स्वभाव म्हणजे भारी मानी आणि भारी हेकेखोर. पण लग्न झाल्यापासून काय कारण झालं कोण जाणे, मी इतका मऊ आलों कीं, माझ्या माहितीच्या लोकांनीं आश्चर्यानं तोंडांत बोटेंच घातलीं. आणि त्यांना इतकं आश्चर्य तरी कां वाटूं नये ? मी बायकोच्या एवढा आधीन होईन असं माझ्या लग्नाआधीं प्रत्यक्ष भास्कराचार्यांनीं जरी भविष्य वर्तविलं असतं तरी त्यावर देखील लोकांनीं विश्वास ठेवला नसता. आणि लग्नानंतर प्रत्यक्षच जेव्हां त्यांनीं माझं लक्षण पाहिलं तेव्हां साहजिकच त्यांना आश्चर्य वाटलं. '

' शामराव, तुम्ही म्हणालांत कीं तुमचा मूळचा स्वभाव भारी मानी होता. असं असतां तुम्ही बायकोच्या एवढ्या मुठींत कसे गेलांत बुवा ? ' माझी जिज्ञासा मला न आंवरतां आल्यामुळें मीं प्रश्न केला.

' सांगितलं ना तुम्हांला, कीं त्याचं कारण माझं मलाच अजून नीटसं कळलं नाहीं. ' शामराव म्हणाले. ' अहो, या बायका म्हणजे भारी पाताळयंत्री. म्हणतात ना, उथळ पाण्याला खळबळ फार. असं असतं आम्हां पुरुषांचं. मुत्सद्देगिरीच्या आणि पातळयंत्रीपणाच्या आम्ही पुरुषांनीं नुसत्या गप्पा माराव्यात; पण खरा पाताळयंत्रीपणा असतो तो या बायकांच्याच अंगीं ! पण वरून मात्र तशा दिसायच्या नाहींत हो ! कशा अगदीं संथ दिसतील. संथ पाणी दिसायला छान असतं; पण विश्वासानं त्यावर पाय ठेवला कीं एकदम गुड्डुम्ऽऽ ! तुम्ही अजून अविवाहित आहांत म्हणून आपुलकीच्या भावनेनं मी तुम्हांला हिताची गोष्ट सांगतों, शहाणे असाल तर लग्नाच्या फंदांत पडूं नका. '

मी एकदम चमकलों. प्रथमाश्रमांतून एकदम चतुर्थाश्रमांत उडी घ्यायला मी केव्हांहि तयार झालों नसतों. त्यांतून शामरावांच्या तत्त्वज्ञानापेक्षां त्यांच्या हकीगतीबद्दलच मला अधिक उत्कंठा असल्यानें व विषय बदलणेंहि जरूर असल्यानें मी म्हणालों,—

‘ शामराव, तुमचा उपदेश आम्ही अवश्य लक्षांत ठेवूं हं. ( आचरणांत आणणार नाहीं ती गोष्ट निराळी !) पण आम्हांला उपदेश करण्याच्या भरांत तुमची हकीगत बाजूलाच राहिली. तुम्ही मूळचें मानी पण पुढें बायकोच्या मुठींत गेलांत एवढा कथाभाग झाला; आतां पुढें ? ’

शामरावांनीं आपल्या कथानकाचा धागा फिरून हातीं घेतला.

‘ अहो, तिच्या मुठींत गेलों एवढंच नव्हे तर तिचा दासानुदास झालों. तिच्या सत्तेचा गुलाम झालों. पहांटे पांचाला थंडींत उठावं, तिला थंडी वाजेल म्हणून स्वतांच्या अंगावरचा रग तिच्या अंगावर घालावा, मग खालीं यावं, केरपोतेर करावं, पाणी भरावं, चहा करावा, चहा झाल्यानंतर वर जावं, तिच्या बिछान्यापाशीं नम्रपणें उभें राहून विचारावं, ‘ साडेसात झाले. उठतांना ? चहा झालाय्. ’ मग बाईसाहेबांनीं आळोखे पिळोखे देत उठावं. कसेंबसें तोंड विसळून—धुऊन नव्हे हं—चहा घ्यावा. तिचा चहा घेऊन होत आहे तोंवर आस्मादिकांनीं पाणी तापवून स्नानाची सिद्धता करावी. तिचं आंगधुणं होत आहे तोंवर आम्हीं चुलीपुढचं करावं. ती चुलीपुढें येत आहे तोंपर्यंत आम्हीं डाळतांदूळ निवडून चुलीपुढें ठेवावेत. आम्हांला हाताखालीं घेऊन तिनं कसेंबसें ते शिजविले कीं चार घांस पोटांत भरून आम्हीं कचेरीचा रस्ता सुधारावा. कचेरीहून परत येतांक्षणींच स्टोव्ह पेटवून दोन कप चहा करावा. एक स्वतांकरितां आणि एक तिच्याकरितां. या कामीं कंटाळा करून भागायचं नाहीं. कुठें दुकानांत चहा घेऊन तल्लफ भागवूं म्हणाल तर तें चालयचं नाहीं. आम्हीं चहा करून दिला नाहीं तर बाईसाहेबांना चहा करून देणार कोण ? असे कित्येक दिवस गेले बरं—कित्येक दिवस असे गेले !

‘ अशा गोष्टी कुठें घरांतल्या घरांत दडून का राहात असतात ? मी स्वाभिमान सोडून बायकोच्या ताटाखालचं मांजर झालों हें वृत्त आस्ते आस्ते आमच्या वाड्यांतल्या साऱ्या बिऱ्हाडकरूंना कळलं. आणि त्यानंतर

थोड्याच काळांत आमच्या गल्लींतले सारे लोक माझ्याकडे कुतूहलानं पाहूं लागले. नवराबायकोच्या भांडणांत नवऱ्याचं वर्तन कसं असावं याबद्दल बायका माझा दाखला देऊं लागल्या आणि पुरुषजातीच्या अब्रूचे मीं धिंडवडे काढले म्हणून गल्लींतली सारी पुरुषमंडळी माझ्यावर दांतओंठ खाऊं लागली. '

' या साऱ्या गोष्टी पर्यायानं माझ्या कानांवर येत किंवा सुचविल्या जात. प्रत्यक्ष माझा अपमान किंवा मला उपदेश करण्याचं धाडस अजून कुणी केलं नव्हतं.'

' पण तोहि प्रसंग लौकरच ओढवला. एके दिवशीं नळावर मी माझ्या पुरुषी पद्धतीप्रमाणें तांदूळ धूत उभा होतों, तोंच शेजारच्या टमाकाकू नळावर आल्या. त्यांनीं क्षणभर माझ्या कृतीचं अवलोकन केलं आणि त्यानंतर सभ्यपणाचा मोटा आव आणून त्या म्हणतात, ' भाऊजी, तांदूळ असे धुवायचे नसतात. असे—' असें म्हणून त्यानीं मला सप्रयोग शिक्षण देण्यास आरंभ केला. मला तें रुचलं नाहीं. माझा मूळचा मानी स्वभाव एकदम जागृत झाला. ' आम्हांला परमेश्वरानं डोकं दिलं आहे. तुम्हीं आम्हांला शिकवायची जरूर नाहीं समजलांत. ' मीं ठमाकाकूंना बजाविलं. ठमाकाकूंना तरी तेवढंच निमित्त हवं होत. त्या म्हणतात, ' भाऊजी, इतकें रागावतां कां? अहो, घरींसुद्धां तुमचं रागावण कुणी मानीत नाहीं आणि घराबाहेर तुमचं रागावण मानावं असं वाटतं तुम्हांला ? ' ठमाकाकूंच्या बोलण्याचा माझ्या वर्मी घाव बसला.

' घरीं मी काय वाटेल ते करीन. त्याची पंचाईत तुम्हाला ? ' मीं दरडावलं.

' झालं. शब्दाला शब्द आणि शब्दागणिक माणसं वाढत चाललीं. रमाकाकू, भिमाकाकू, गंगाबाई, भागीरथीबाई—आपापल्या घरचीं कामं अर्धवट टाकून नळाकडे धांवत सुटल्या. त्यांच्या मागोमाग त्यांचे पति, त्यांचे मुलगे, त्यांच्या सुना, धावत आल्या. माझ्यासभोंवतीं या साऱ्या

मंडळींनीं एक अभेद्य कोंडाळं निर्माण केलं. जो तो म्हणूं लागला, ' अहो, तुम्हांला घरीं कामं करावीं लागतात, तीं शास्त्रशुद्ध कशीं करावीं याचं तुम्हाला शिक्षण दिलं तर त्यांत तुम्हांला इतका राग कां यावा ?'

' इतक्या मंडळींच्या तोंडाला माझं एकट्याचं तोंड कितीसं पुरणार ! अशा वेळीं मला मदत करील असं एकच माणूस होतं. मी आशाळभूत नजरेनं त्या माणसाकडे पाहिलं. सौभाग्यवती माडीवरच्या खिडकींतून हा सारा प्रकार अवलोकन करीत होती. तिची माझी दृष्टादृष्ट होतांच ती माझ्याकडे पाहून फिदीफिदी हंसूं लागली. बायका अशा विश्वास-घातकी असतात ! ब्रह्मदेवानें ही विश्वासघातकी जात का पैदा केली कोण जाणे ! त्याच्या अभावीं जग किती सुखी झालं असतं ! तुमचं लग्न होण्या-पूर्वी तुमची आमची गांठ पडली हें तुमचं भाग्य समजा. शहाणे असाल तर लग्नाच्या फंदांत पडूं नका.—'

' अहो, पण तुमची हकीगत तशीच राहिली ! मला ती ऐकण्याची भारी उत्कंठा लागली आहे. तेव्हां तुम्हाला जी कांहीं मल्लीनाथी करायची असेल किंवा तात्पर्य सांगायचं असेल तें मागाहून सांगा. अगोदर हकी-गत तर पुरी करा.' मी म्हणालों.

शामरावानीं फिरून सुरवात केली, ' कुठपर्यंत आली होती बरें हकी-गत ?...हं आलं लक्षात. फिदीफिदी हंसणाऱ्या बायकोला पाहून असा राग आला म्हणतां कीं कांहीं विचारूं नका ! रागाच्या भरात हातांतले धुतलेले तांदूळ तस्से फेंकून दिले आणि पाय आपटीत घरांत गेलों. लोक तरी किती निलाजरे म्हणतां ! यांची नुसती कावळ्याची वृत्ति. कुठें क्षतं पडतात नी कुठें टोंच मारायला मिळते ! माझ्या मनःस्थितीबद्दल मला सहानुभूति दाखवायची तर दूरच राहिली, पण सारेजण खदखदां हंसूं लागले !—

' घरांत आलों. मनाशीं निश्चय केला कीं बस्स, आजपासून इकडची काडी तिकडे करायची नाहीं ! हो, ऑफिसांत कमरेचा कांटा ढिला होईतों

राब–राब–राबावं, महिन्याकांठीं मिळणारे तीस रुपये जसेच्या तसे सौभाग्यवतीच्या स्वाधीन करावेत आणि वर घरांतली हमाली! यांनीं फक्त ताटावरून पाटावर नी पाटावरून ताटावर करावं! काय अन्याय आहे पहा! पुरुषांवर हा निव्वळ जुलूम आहे. देवा परमेश्वरा, यांतून आम्हां पुरुषांची केव्हां मुक्तता करणार आहेस कोण जाणे! भक्तवत्सला भगवंता, दीनाला सहाय्य करण्याचा तुझा लौकिक जुनापुराणा असताना मलाच कसा बरें विसरलास? ..

'अशा तऱ्हेचे विचार करीत मी पडून राहिलों. तोंच माझ्या नांवाची बाहेर कुणीशी चौकशी केली आणि थोड्याच वेळानं चौकशी करणारा पोऱ्या आत आला. त्यानं माझ्या हातीं एक पार्सल दिलं. पार्सल माझ्या हातीं पडताच तो पोऱ्या परत फिरला आणि मी 'थांब थांब' म्हणत आहे तोंवर तो पार निघूनहि गेला.

'पार्सलावर तें कुणाकडून आलं आहे यासंबंधीं कांहींच उल्लेख नव्हता. चांचपून पाहतां मऊमऊ कापडासारखं कांहींसं हाताला लागलं. चटकन् आठवण झाली—

'चार दिवसाखालीं कुंदनमल शेटजीकडे सौभाग्यवतीकरितां एक रेशमी पातळ खरेदी करावयास गेलों होतों. माल उधार आणायचा होता आणि कुंदनमलच्याच दुकानीं आमचं खातं होतं. पण शेटजीच्या दुकानीं आम्हास हव असलेलं पातळ नव्हतं. शेटजींनीं 'आठ दिवसात येईल' असं आश्वासन दिलं होतं. त्या आश्वासनाची आठवण झाली. वाटलं, चार दिवसांतच शेटजींच्या दुकानीं माल आला असावा आणि त्यांनीं मुद्दाम पातळ घरीं धाडून दिलं असावं.

'त्यासरशीं मघांचा राग विसरून जाऊन मीं तिला हांक मारली नवराबायकोंतला राग. राग कसला तो? राग नव्हेच तो. अनुरागाचीच तऱ्हा आहे ती. त्या रागाचं अस्तित्व किती वेळ टिकायचं आहे? तळ्यांतल्या पाण्यावर रप्रप् पाऊस पडूं लागला कीं पृष्ठभागावर फुलवाती उभ्या

राहतात नी लगेच नाहींशा होतात त्यांतलाच प्रकार.

'माझ्या हांकेसरशी ती धांवून आली.

'पाहिलंस? कुंदनमल शेटजींनीं पातळ धाडलं.' मीं म्हणालों.

'खरं कीं काय?' असं म्हणत तिनं खसकन् माझ्या हातून तें पार्सल हिसकावून घेतल आणि टर्कन् त्याच्यावरचा अभ्रा फाडून टाकला. आंतली वस्तु दिसली मात्र —

'—एक फाटकं जुनेर होतं तें! आणि सोबत पत्रहि होतं. तिनें मोठ्यादा तें वाचलं —'मित्रवर्य शामराव गरूड यास, पहांटेच्या वेळीं आपण केरपोतेरें करता त्या वेळीं आपणास लावून घ्यावयास सोबत पाठविलेल्या जुनेराचा अतिशय उपयोग होईल हें ओळखून मित्रभावानं आम्ही तें आपणाकडे रवाना करीत आहों. स्वीकार व्हावा.' खालीं सही अर्थातच नव्हती

'पत्र वाचताच ती खदखदां हंसू लागली. मला मात्र तोंडात मारल्यापलीकडे झालं! तिला खोलींतून अगोदर बाहेर जायला सागितल. ती निघून जातांच आतून कडी लावून घेतली आणि विचार करूं लागलों.'

'छे! आता मात्र कहर झाला! वाड्यातल्यापैकींच कुणातरी चहाटळांच कृत्य दिसत हें! आतां याचा काहींतरी बंदोबस्त केलाच पाहिजे. बाकी प्रथम माझीच चूक झाली म्हणा. बायकोच्या आहारीं मीं प्रथम जायला नको होतं. पण आतां या म्हणण्याचा उपयोग काय? छे! कांहींच मार्ग सुचेना. अखेर कोटटोपी चढविली आणि बाहेर पडलों.'

'घरून निघालों तों थेट माझा परम स्नेही विद्याधर गुभे याच्याकडे आलों. मी विद्याधराच्या दिवाणखान्यांत शिरताच विद्याधरानं पहिला प्रश्न केला——

'कोण शामराव! आश्चर्य आहे! अरे, ही तर ऐन सैंपाकाची वेळ! या वेळीं तुझी कशी मोकळीक झाली बुवा?'

' ए माझे आई ! मी तुझे पाय धरतों; पण हें असलं कांहींतरी टोंचून बोलूं नको बाबा. '

' माझ्या भाषेतला हा रडका ध्वनि ऐकतांच विद्याधरानं ओळखलं कीं कांहींतरी भानगड दिसतेय–'

' त्यानं मला खुर्चीवर बसायला सांगितलं. मला धीर दिला. माझी हकीगत शांतपणें ऐकून घेतली. माझी अडचण मीं खुल्या दिलानं त्याच्या-पुढं मांडली. त्यानंहि थोडा वेळ विचार केला आणि त्यानंतर एकदम माझे दोन्ही हात आपल्या हातीं घेऊन तो हर्षातिशयानें म्हणाला, ' दोस्त घाबरूं नको. आहे, एक उपाय आहे. '

' विद्याधराकडून मी परत घरी आलों. घरीं येऊन पाहतों तों काय! चूल थंडगार ! थंडच झालों ! थंडा फराळ करून कचेरीचा मार्ग सुधारावा लागणार हें स्पष्ट दिसत होतं. आतां तर दहा वाजले. अकराला तर कचेरींत हजर असायला पाहिजे. आता कुठला सैंपाक नी कुठला शिधा ! राग यायला आणखी एक कारण झालं. घरीं पाऊल टाकतांक्षणींच तिनं माझ्यावर एकदम तोंडसुख घ्यायला सुरवात केली. नवरा व नोकर यात काय फरक आहे सांगा ? तुमचा नोकर उशीरा आला तर तुम्ही त्याला शिव्या नाहीं का देत ? त्यातलीच आम्ही नवरेमंडळी. हीं आमचीं नवरेपणाचीं सुखं. म्हणून सांगतां कीं, शहाणे असाल तर लग्नाच्या फंदात पडूं नका.

' विचार केला, थोडक्यावर आलंय. उगीच तोंडाला तोंड देत बसण्यांत अर्थ नाहीं. आपलं कानाला फडकं बांधूनच कामाला लागलेलं काय वाईट ! झटपट काम उरकलं. तांदूळ शिजविले, चार घांस खाल्ले, आणि कचेरीची वाट धरली.

' साहेबांची परवानगी घेऊन साडेचाराला परत घरीं आलों. सौभाग्यवती पलीकडच्या बिऱ्हाडांतून पत्त्याचा डाव नुकताच आटोपून घरीं आली होती. नेहमींप्रमाणें स्टोव्ह पेटवून मीं चहा केला. एक कप तिला दिला, एक कप मीं घेतला.

‘ चहा पितांपितां गप्पा निघाल्या–

‘ मी म्हणालों,—बायकांचं आयुष्य मोठं सुखाचं असतं नाहीं ? कुठ-ल्याशा पुस्तकांत मला वाचल्याचं आठवतं कीं, बाबांच्या पोटीं बन्या म्हणून जन्माला आलों तो तर बबी म्हणून जन्माला आलों असतों तर केवढी बहार झाली असती !–

‘ ती कांहींच बोलली नाहीं.

‘ किंवा अधिक योग्य वर्णन करायचं तर असं म्हणायला हवं कीं, तिनें कांहींच बोलून दाखविलं नाहीं.

‘ न बोलतांहि तिचा आशय मला कळला.

‘ तो आशय दुसरातिसरा काय असणार ?

‘ सध्यांच्या काळांत बायकांची सद्दी आहे !—–

‘ मीं तें ओळखलं व म्हणालों,—खरंच आर्यांनीं स्त्रियांच्या बाबतींत फारच अन्याय केलेला आहे. अमुक कर्तव्यें स्त्रियांनीं करावींत नी अमुक पुरुषांनीं करावींत असा आग्रह कां ? मी नाहीं का जातीचा पुरुष असून बायकांचीं सगळीं कामं करीत ? तरी पण कधींकधीं माझ्या मनांत एक शंका येते कीं, मी जातीचा पुरुष आहे आणि मी जीं कामं करतों तीं कामं न करणं ही गोष्ट पुरुषजातीच्या हाडींमासीं खिळलेली आहे. असं असतां मलाच कशीं हीं कामं इतकीं उत्तम करतां येतात ?—’

‘ याचं उत्तर कांहीं अवघड नाहीं,’ विद्वत्तेचा आव आणून ती म्हणते, ‘ या शंकेचं उत्तर फार सोपं आहे. माझ्या आत्म्याचं तुमच्या आत्म्यावर दडपण बसल्यामुळें माझे गुण कळत न कळत तुमच्या अंगीं उतरले आणि तुम्हांला हीं कामं करतां आलीं.’

‘ अहाहा ! काय विद्वत्ता ! काय ज्ञान ! काय शब्द ! अहाहा ! ‘आत्मा !’ ‘दडपण !’ छाती दडपून गेली माझी ! नुसता गारच झालों. आणि गार होऊन स्वस्थ बसलों नाहीं तर आनंदानें नाचूं लागलों

हाताला येईल तें वाजवीत सुटलों. आणि एकदा तर बाहेर व्हरांड्यांत जाऊन घरावरच्या पत्र्यावर दोन दगडहि टाकून आलों.

‘ इषारा झाला.

‘ थोड्या वेळानें माझा स्नेही विद्याधर आणि ऑफिसांतील एकदोन मंडळी माझ्या खोलींत आली. ’

‘ शामराव, तुझ्याकडे थोडं काम आहे. ’ विद्याधर म्हणाला.

‘ फार निकडीचं आहे कीं आपलं नेहमींपैकींच ? ’ मी म्हणालों.

‘ नेहमींपैकींच. ’ तो म्हणाला.

‘ मग स्वस्थ बैस तर. आज मला विलक्षण आनंद झाला आहे. काय करूं नी काय नको करूं, असं झालं आहे. मारुतीसारखं उड्डाण करूं, कुंभकर्णासारखा ओरडूं, शंकरासारखा तांडवनृत्य करूं, काय करूं तरी काय ? ’

‘ माझे बोल ऐकतांच तो खदखदां हंसूं लागला.

‘ तिलाहि हंसूं लोटलं हें सांगायला नकोच.

‘ आणखीन् काय काय करावंसं वाटतं बुवा तुला ? ’ विद्याधरानं विचारलं.

‘ आणखी वाटतं दोन वेळां यथेच्छ भोजन करावं, बाराबारा तास झोंपा ताणाव्यात, पांचसहा तास पत्त्यांनीं खेळावं, संध्याकाळच्या सुमारास नटूनथटून देवाला जावं, जिवाला जीव देणारीं माणसं संकटांत सांपडलीं असतां फिदीफिदी हंसाव, जवळच्या माणसाना शक्य तितका जास्त त्रास द्यावा, नेहमीं स्वताचा स्वार्थ नी सुखसोयी पहाण्यात, दुसऱ्याच्या अडीअडचणी बिलकूल पाहूं नयेत ’—

‘ मध्येंच मी एकदां आमच्या सौभाग्यवतीकडे पाहिलं.

‘ तिचा चेहरा काळाठिक्कर पडला होता.

‘ आणि विद्याधर ?—

‘ त्याची हंसतां हंसतां मुरकुंडी वळत होती.

‘ मी बोलायचा थांबतांच विद्याधरानं विचारलं—

‘ तुला असं वाटतं याचं कारण काय बुवा ? ’

‘ याचं उत्तर कांहीं अवघड नाहीं, ’ विद्वत्तेचा आव आणून मी म्हणालों, ‘ या शंकेचे उत्तर फार सोपं आहे. आमच्या सौभाग्यवतीच्या आत्म्याचं माझ्या आत्म्यावर दडपण बसल्यामुळं तिचे अवगुण व तिच्या इच्छा कळत न कळत माझ्या अंगीं उतरल्या आणि—

‘ माझे वाक्य पूर्ण व्हायच्या आंतच ती मान खालीं घालून चटकन् उठून गेली.

‘ ती जातांक्षणींच आम्हीं दोस्तांनीं आनंदातिशयानें एकमेकांना गाढ आलिंगनें दिलीं.

  

‘ दुसरा दिवस. सकाळची वेळ. मला गाढ झोंप लागलेली नव्हती; पण गुलाबी थंडींत मी गुरफटून घेऊन झोंपेच्या गुंगींत पडून होतों.

‘ तोंच कानांवर गोड ध्वनि आला, ‘ साडेसात झाले. उठायचं ना ? चहा झालाय्. ’

‘ तोंडावरचा रग मी भर्रकन बाजूला फेंकून दिला.

‘ उगवत्या सूर्याचे प्रसन्न किरण खोलीभर पसरले होते.

‘ पण त्या किरणांपेक्षांहि जास्त प्रसन्नता आज माझ्या मनाला आलेली होती.

‘ आणि माझ्या मनापेक्षांहि जास्त प्रसन्नता आज आमच्या घराला आलेली होती.

‘ कारण आज आमच्या घरांत गृहिणी आणि गृहस्थ यांच्या कामांचं वांटप झालं होतं. आणि पुष्कळ दिवस घरांत गृहिणी असून नसल्यासारखीच असल्यानं वनाप्रमाणं उदास भासणारं आमचं घर आज उपवनाप्रमाणं रम्य वाटत होतं.

'माझी हकीगत संपली. आतां तिचं तात्पर्य. त्यांतून माझ्या हकीगतींतून मला दुहेरी तात्पर्य काढायचं आहे. पहिलं, तुम्ही शहाणे असाल तर लग्नाच्या भानगडींत पडूं नका. आणि दुसरं, यदाकदाचित् लग्नाच्या भानगडींत पडण्याचा मूर्खपणा तुमच्या हातून घडलाच तर निदान बायकोच्या सत्तेचे गुलाम तरी होऊं नका. गृहस्थाश्रमाचा खरा आनंद कुणी कुणाचे गुलाम होण्यांत नाहीं, तर स्वयंप्रेरणेनं आपापलीं कर्तव्यं पार पाडण्यांतच आहे.'

मनोहर—आगष्ट १९३५

## हातावरील रेषा : १६

आमचं लग्न झाल्यानंतर येणारी ही दुसरी दिवाळी. पहिल्या दिवाळीला मला माहेरीं जायलाच मिळालं नाहीं अन् आतां दुसऱ्या दिवाळीचंहि असंच होणार असा रंग दिसूं लागला.

पहिल्या दिवाळीच्या अगोदर माहेराहून बोलावणं आलं, तेव्हां म्हणायचं झालं,—

‘ हें पहा, तूं गेलीस तर ऐन दिवाळींत आम्हाला खानावळींत तुकडे मोडावे लागतील नी नळाखालीं आंघोळ करावी लागेल. तेव्हां जायचं किंवा नाहीं हें तूंच ठरव. ’

‘ पण बोलावणं कांहीं मला एकटीलाच नाहीं. ’ मी म्हणाल्यें.

'छान ! मीहि तुझ्याबरोबर आलों कीं भागलंच कीं मग ! हे तर आमच्या ऐन मिळकतीचे दिवस. शेतकऱ्यांनीं जशी सुगी चुकवूं नये तशी आम्ही पुस्तकविक्रेत्यांनीं व न्यूजएजंटांनीं दिवाळी चुकवूं नये. सुगी चुकविणाऱ्या शेतकऱ्यांच्या बायकांमुलांना सालभर अर्धपोटीं रहावं लागतं तसंच दिवाळीचा मोसम चुकविणाऱ्या आमच्यासारख्या व्यापाऱ्यांच्या बायकांमुलांना...'

'समजलं ! समजलं !!' मी मध्येंच म्हणाल्ये, 'पण मुलांचा प्रश्न कुठं आहे आमच्या इथं ?'

माझ्या बोलण्यांतली खोंच चटकन् लक्षांत आली असावी. नेहमीं-प्रमाणं एकदां गोड हंसायचं झालं नी म्हणतात, 'आज नसेल तो प्रश्न; पण पुढंमागं तो जन्माला यायचाच नाहीं, असं नाहीं कांहीं !'

'इश्श ! कांहींतरीच !' मी उद्गारलें. 'दिवाळीचा मोसम चुकला तर बायकांना वर्षभर अर्धपोटीं रहावं लागत ना ? माझी तयारी आहे अर्धपोटीं रहाण्याची, पण दिवाळीला मी एकटीच नाहीं जायची.'

माझ्या हट्टाचा नी युक्तिवादाचा काहीं उपयोग होणार नाहीं याची मला पहिल्यापासून कल्पना होती. तथापि आशा कुणाला सुटली आहे ? दिवाळीच्या मोसमाचं कारण कांहीं अगदींच खोटं नव्हत; पण त्यापेक्षांहि महत्त्वाचं कारण म्हणजे इकडचा मानी नी भिडस्त स्वभाव. या स्वभा-वाची मला आतां चांगली ओळख झाली होती. म्हणून माझ्या युक्ति-वादाचा नी हट्टाचा कांहींच परिणाम झाला नाहीं, तेव्हां मला मुळींच आश्चर्य वाटलं नाहीं.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं दुकानावर जायचं झालं. माझा धाकटा भाऊ माधव मला बोलाविण्याकरितां आला होता. तोहि बरोबरच तिकडे दुकानाकडे गेला.

माझ्या मनांत मात्र एकच विचार घोळत होता. माधवाबरोबर माहेरीं जावं कीं न जावं ? एकदां वाटे, आईला-दादांना भेटून किती दिवस

झाले ! दिवाळीच्या निमित्तानें तरी त्यांना भेटून यायला होईल. पण तत्क्षणीं तिकडचे शब्द जसेच्या तसे डोळ्यांपुढें उभे राहात—

'ऐन दिवाळींत आम्हांला खानावळींत तुकडे मोडावे लागतील नी नळाखालीं आंघोळ करावी लागेल—'

अखेर न जाण्याचाच निश्चय मी कायम केला. माधवाला मी ज्या वेळीं 'पाठवून द्यायचं मनांत नाहीं' असं सांगितलं तेव्हां टच्कन् त्याच्या डोळ्याला पाणी आलं. तें पाहून माझ्याहि पोटात कालवाकालव झाली. पण एकदां निश्चय झाल्यावर तो सहसा ढळायचा नाहीं असा माझा स्वभाव असल्यानें बिचाऱ्या माधवाला एकट्यालाच परत जावं लागलं.

पहिल्या वर्षी असा प्रकार झाला तेव्हां सावध होऊन दादांनी मला पाठवून देण्याविषयीं दुसऱ्या वर्षी दिवाळीच्या अगोदरच महिना दीड महिना पत्रव्यवहार चालू ठेवला. एका पत्रांत तर 'कमाताईच्या आईला तिला भेटण्याची फार उत्कंठा लागली आहे' असा मजकूर होता. तो मजकूर मी वाचला तेव्हा माझं काळीज एकदम हालल्यासारखं झालं. आईचा माझ्यावर केवढा जीव होता याची आठवण झाली. माझ्या लग्नाबद्दल दादांच्यामागं एकसारखं टुमणं लावणारी आई माझं लग्न होतांच ढळढळां अश्रू ढाळूं लागली तो प्रसंग जशाचा तसा आठवला. एकदम मीं ठरविलं, यंदा कांहीं झालं तरी दिवाळीला माहेरीं जायच आणि संधि पाहून मीं माझा निश्चय तिकडच्या कानांवर घातलाहि.

दिवाळीच्या अगोदर दोन दिवस माधव मला बोलावण्याकरितां आला. तो आला त्याच्या दुसऱ्या दिवशीं सकाळींच निघायचं ठरलं. तेव्हां रात्रीं मला मद्दाम बजावायचं झाल, 'फार तर एका आठवड्यानंतर परत यायला हवं हो. नाहींतर टाकाल मुक्काम महिना–पंधरा दिवस!'

यावर मी कांहीं बोलल्यें नाहीं हंसल्यें मात्र मनापासून. त्या हंसण्याच्या योगानं मला एवढंच सुचवायचं होतं कीं, केवढी अशक्य गोष्ट बोलायची

होते ! काय म्हणे महिनापंधरा दिवस मुक्काम टाकीन ! पुरुषांचे विचारच भारी चमत्कारिक !

मी आज कितीतरी दिवसांनीं आई–दादांना भेटत होत्यें. दादांना आणि विशेषतः आईला पाहून मला केवढा आनंद झाला ह्याचं वर्णन मी कसं करूं ? तिनें माझ्यावरून ओंवाळून काय टाकलं, मी आंत जातांच मला घट्ट पोटाशीं काय धरलं,—जणूं कांहीं मी आठनऊ वर्षांची परकरी कमाच ! आईच्या प्रेमाचा हा वर्षाव माझ्यावर चालला असताना नकळत माझ्याहि सर्वांगावर कांटे उभा राहिले. एक अत्यंत गोड कल्पना माझ्या मनांत चमकून गेली.—आई होण्याचं हें आयुष्यांतलं अत्यंत मोठं भाग्य असलं पाहिजे, नाहीं ?

माझे दिवाळीचे दिवस अगदीं मजेंत चालले होते. आणि दिवसा-कांठीं मला तिकडची वारंवार जी आठवण होई ती तशी होऊं नये म्हणू-नच कीं काय कोण जाणे, एक गोष्ट घडन आलेली होती—

आमच्या घराशेजारीं सोहनींची मंडळी राहात असत. सोहनींची गोदू ही माझी अगदीं बालपणापासूनची मैत्रिण. आम्ही दोघी वयानेंहि सारख्याच. माझं लग्न ज्या महिन्यांत झालं, त्याच महिन्यांत दुसऱ्या एका मुहूर्तावर गोदूचं लग्न झालं. गोदूदेखील माझ्याप्रमाणेंच दिवाळीसाठीं माहेरीं आलेली होती.

तिच्यांत व माझ्यांत एवढ्या गोष्टींचं साम्य होतं तरी एका बाबतींत मात्र आम्हां दोघींत पूर्ण वैषम्य होतं. तिच्या हातीं भरलेला हिरवा चुडा, पांढुरके गाल......एका नव्या जिवाच्या जबाबदारीचं ओझं तिच्यावर दर दिवशीं वाढत चाललेलं होतं !

अन् या नव्या जिवाच्या जबाबदारीची काळजी तिला जाणवूं नये म्हणूनच कीं काय कोण जाणे, तिचे आईबाप तिच्याकरितां रोज एकादा नवा बेत करीत. जोंपर्यंत हे बेत केवळ पक्कान्नापुरतेच मर्यादित होते तोंपर्यंत आमच्यासारख्या शेजाऱ्यांना त्यांच्याशीं कांहींच कर्तव्य नव्हतें. पण

दिवाळी झाली, प्रमुखप्रमुख पक्वान्नेंहि करून झालीं, तेव्हां दुसरेच बेत सुरू झाले. आज काय चांदण्यांतली पंगत, उद्यां काय वनभोजन, परवां काय टेकडीवर जायचं, तरवा काय नावेत बसायचं, असे अनेक बेत अमलांत येऊं लागले.

इकडे दोनचार दिवसाआड 'तिकड'चीं पत्रे येत. तिकडचं पत्र येतांच मी परत जाण्याचा विचार करूं लागे. आईदादांच्या मनांत मात्र मी इतक्या लौकर परत जावं असं मुळींच नव्हतं. त्यामुळे त्यांनीं परत सासरीं जाण्याच्या माझ्या बेताला संमति तर दिली नाहींच; पण उलट माझ्या बेताला मोडता घालण्याचाहि प्रयत्न सुरू केला.

पण माझ्या बेताला केवळ आई–दादानींच मोडता घातला असता तर मी कदाचित् त्याला जुमानिलं नसतं; पण माझ्या जाण्याची गोष्ट मी गोदूजवळ काढली कीं तिनं म्हणावं, 'जाशील कीं ग! गेल्याखेरीज भागतंय् थोडंच. उद्या तेवढं टेकडीवर जाऊन येऊं, मग हवी तर जा.' आणि गोदूच्या या शब्दाचा माझ्या मनावर कोण परिणाम होई देव जाणे! मी परत जाण्याचं पुढें ढकलीत असे.

टेकडीवर जाऊन येण्याचा कार्यक्रम झाल्यानतर मीं गोदूजवळ परत जाण्याची गोष्ट काढली कीं, तिनं म्हणावं, 'हे पहा, आतां तेवढं नावेंतून जाऊन यायचं आटपून घेऊं मग तूं आपली जा.' आणि मी तिच्या शब्दाना भुलून पुन्हा परत जाण्याचं लांबणीवर टाकीत असे.

कधींकधीं मी स्वतःशींच विचार करी, गोदू गरभारशी नसती अन् तिनें मला राहण्याचा आग्रह केला असता तर मी तो मानला असतां का?

अन् या प्रश्नावर नकारार्थी उत्तर आल्यानंतर मी विचारी, ती गरभारशी आहे म्हणून तिच्या शब्दांची माझ्या मनावर अशी मोहिनी कां पडावी?

या प्रश्नाचं उत्तर मात्र मला कधींहि मिळाल नाहीं.

या धांदलींत मला माहेरीं आल्यास तीन आठवडे होऊन गेले.

तिसऱ्या आठवड्यांत ' तिकड 'चे अजिबात पत्र आलं नाहीं तेव्हां मात्र माझं मन चरकलं. अन् मीं परत जाण्याचा विचार निश्चित केला. पण आईची संमति मिळून अन् जाण्याची तयारी होऊन घराबाहेर पडायला आणखी एक आठवडा लागला. त्या आठवड्यांतहि तिकडचं कांहींच पत्र आलं नव्हतं.

मी गाडींत बसल्ये अन् मार्ग चालू लागल्यें तेव्हां तिकडचा राग हा एकच विषय माझ्या साऱ्या विचारशक्तीला व्यापून उरला होता.

गेल्या अडीच वर्षांत तिकडून रागवून घ्यायचे फारसे प्रसंग माझ्यावर आधीं आलेच नव्हते. जे एकदोन आले त्यांवरून मात्र ' तिकड ' च्या रागाची मला पूर्ण कल्पना आलेली होती

राग नी दुःख या भावनाच अशा आहेत कीं, त्याचा मार्ग मोकळा करून देणं हेंच अधिक हिताचं असतं. ' इकड ' चा स्वभाव या बाबतींत अगदींच उलट. राग आला तर मनांतल्या मनात ठेवायचा अन् त्यायोगे स्वतांच्याच जिवाला त्रास करून घ्यायचा !

या वेळीं असंच करणं झालं असेल हे मला स्पष्ट कळून चुकलं. स्वतांला त्रास करून घेण्याचे ते प्रसंग माझ्या कल्पनाचक्षूंसमोर उभे राहिले माझ्या डोक्यात विलक्षण काहूर माजलं. डोळ्यांत नकळत टिपं आलीं. तेव्हा दचकून माधवानं विचारलं, ' का ग ताई, काय होतयं तुला ? '

त्याला मी काय उत्तर देऊं ? खरं सांगणं योग्य झालं असतं का ? आणि खरं सांगून ते पटलं असतं का ? मी चटकन् सांगून मोकळी झाल्ये, ' आईला सोडून जायचं जिवावर आलंय हो माझ्या. ' या बोलण्याचा त्याच्यावर काय परिणाम होतो हें मी लक्षपूर्वक पाहूं लागल्यें. त्यानं एक दीर्घ निश्वास सोडला. माझ्या उत्तरानं त्याचं पूर्ण समाधान झालं असावं.

मी ' माझ्या ' घरीं पोंचल्यें तेव्हां दहा वाजण्याची वेळ झाली होती. नेहमींप्रमाणं शेजारच्या उमाकाकूंच्या घरीं किल्ली देऊन दुकानावर जायचं

झालं होतं. उमाकाकूंकडून किल्ली घेऊन मीं घरीं प्रवेश केला. स्टोव्ह पेटवून माधवाला चहा करून दिला अन् त्याचा चहा घेऊन झाल्यावर त्याला दुकानावर जाऊन भेटण्यास पाठवून दिलं.

मीं अंग धुऊन घेतलं व कोरडें नेसून सैंपाकास सुरवात केली. घरीं परत यायची वेळ म्हणजे बाराची. माधवाला अकरा वाजताच घरीं जायला सांगितलं होतं. अन् तो बिचारा घरीं येऊन आंघोळ वगैरे आटोपून 'स्वतः'च्या येण्याची वाट पहात बसला होता. बारा झाले, साडेबारा झाले, तरी कांहींच पत्ता नाहीं! माझ्या मनाला चुटपूट लागून राहिली. अखेर पाऊण वाजण्याच्या सुमारास जिन्यावर माझ्या पूर्ण ओळखीच्या पावलांचा आवाज ऐकू आला! माधव 'स्वतः'च्या येण्याची वाट पहात दारांतच उभा होता. आंत येतांक्षणींच विचारणं झालं,—

'माधवराव, जेवण नाहीं का आटपून घ्यायचं ?'

बोलण्याला ही संधि बरी आहे असं पाहून मी मध्येंच म्हणाल्ये,

'पण स्वतः आल्याखेरीज तो एकटाच कसा बसेल ?'

'अस्सं !'

जोर देऊन उच्चारलेले ते दोनच शब्द, तो तिरपा कटाक्ष, कपाळावर उठलेल्या त्या दोन उभ्या रेषा.. .. साऱ्या गोष्टींची मला स्पष्ट कल्पना येऊन चुकली. तथापि माझ्या मनांतल्या कोनाकोपऱ्यात कदाचित् संशय दबा धरून बसलेला असावा, त्यास बाहेर काढण्यासाठींच कीं काय कोण जाणे, म्हणायचं झालं, 'पण माझं जेवण केव्हांच आटोपलं आहे.'

'कुठं ?' मी विचारलें.

'कृष्णाश्रमांत.'

'कधीं ? आम्ही येण्यापूर्वी ?'

'नव्हे. तुम्ही आल्यानंतर. नुकतंच.'

'माधवाकडून आम्ही आल्याचं कळलं होतं ना ?'

'कळलं होतं.'

‘ मग कृष्णाश्रमांत जेवण्याची जरूरी कुठं होती ? ’

‘ सैंपाक करण्याची तुमची लहर लागते कीं नाहीं अशी शंका आली म्हणून ! आतांशा तुमच्या लहरीची तब्बेत फार नाजूक झाली आहे ! ’ एवढें बोलून झटकन् आपल्या खोलींत जायचं झालं.

किती भेदक होते हे शब्द ! कुठून मला महिनाभर माहेरीं राहण्याची दुर्बुद्धि झाली असं वाटलं ! माझे हुंदके मला आंवरेनात. पण ते आंवरण्याखेरीज गत्यंतर नव्हतं हेंहि तितकंच खरं होतं. मीं डोळ्यांचं पाणी पुसून टाकलं, चूळ भरली, अन् आग्रह करून माधवाला जेवायला वाढलं. त्याचं जेवण झाल्यावर मीं मला वाढून घेतलं. पण सबंध जेवणांत मी कालवण घ्यायचंच विसरल्यें ! कदाचित् माझ्या घासांना माझ्या डोळ्यांतल्या अश्रूंचा कालवणासारखाच उपयोग झाला असेल म्हणून माझ्याकडून कालवण घ्यायचं राहून गेलं असावं.

माझ्या दुःस्थितीबद्दल मला वाईट वाटत होतं. पण त्यापेक्षा माझ्या दुःस्थितीचा वास माधवाला आला याबद्दल मला जास्त वाईट वाटत होतें. माधवाकडून माझी दुर्दैवी कहाणी आई-दादांना कळल्याखेरीज रहायची नाहीं, अन् ती कळल्यावर त्यांचा जीव मात्र टांगल्यासारखा व्हायाचा हे माझ्या मनांत आलं. अन् तत्क्षणीं मी माधवाला बाजूला बोलावून त्याला माझ्या गळ्याची शपथ घालून हें वृत्त आई--दादांना न सांगण्याबद्दल बजाविलं.

दुपारच्या गाडीनं माधव परत निघून गेला.

थोड्या वेळानं स्वतःहि दुकानाकडे जायचं झालं. मी आपली हताश मनानं एकटीच माझ्या दुर्दैवाला बोल लावीत बसून राहिलें.

‘स्वतः’चा स्वभाव मूळचा कठोर नव्हता, याबद्दल मला कितीदां तरी प्रत्यंतर आलं होतं ; पण स्वभाव कठोर नसला तरी मानी होता अन् थोडा हट्टीहि पण होता. माझ्याबरोबर बोलायचं नाहीं किंवा रुसवा करायचा असा हट्टच जर मनानं घेतला असेल तर तो किती दिवस राहणार होता कोण जाणे !

संध्याकाळच्या जेवणाच्या वेळींहि दुपारच्या जेवणाच्या वेळचीच आवृत्ति झाली. दुपारच्याप्रमाणेंच खोलींत जायचं झालं अन् कसल्याशा पुस्तकांत डोकं खूपसून बसायचं झालं.

मीहि जेवणाच्या भानगडींत पडल्यें नाहीं. सगळा सैंपाक जशाचा तसा मोलकरणीच्या स्वाधीन करून टाकला. असा ताजा सैंपाक हातीं आल्याबद्दल बिचारीला कितीतरी आनंद झाला असेल अन् बिचारीनें मला कितीतरी धन्यवाद दिले असतील !

दुधाचा एक कप, थोडे फराळाचे जिन्नस, अन् पाण्याचा तांब्या घेऊन मी खोलींत गेलें. माझ्या येण्याची चाहूल खात्रीनें कानीं गेली असली पाहिजे. पण जसं कांहीं आपल्या गांवींच नाहीं अशा वृत्तीनं खुशाल वाचन चाललं होतं.

अखेर मलाच राहवेना म्हणून मी म्हणालें, ‘ पाहिलंत का ? हें असं किती दिवस चालायचं ? या घरीं माझी अडचण होत असेल तर मला आपली माहेरींच रहायला सांगा कशी ! आपल्या नशिबांतच तसं लिहिलं असेल तर...’

‘ यांत तुमच्या नशिबाला कशाला बोल लावतां ? आम्हीच दुर्दैवी आहोंत. हें पाहिलंत, हा माउंट ऑफ ज्युपिटर. इथून ही रेषा निघाली आहे. ज्यांच्या हातावर अशी रेषा असते तीं माणसं मनाचीं अत्यंत हळवीं आणि फाजील प्रेमळ असतात. सुदैवानं त्यांची जन्माची गांठ तसल्याच स्वभावाच्या माणसाशीं पडली तर त्यांचा संसार सुखाचा होतो. आणि जर का दुर्दैवानं त्यांची गांठ तुमच्यासारख्या व्यवहारी व हिशेबी माणसाशीं पडली कीं, त्यांच्या मनाचे हाल कुत्रादेखील खात नाहीं ! ’

तो माऊंट ऑफ् ज्युपिटर काय, मला कांहींच कळेना. एखाद्या मोठ्या कारखान्यांत एखाद्या खेडवळाला नेऊन सोडलं असतां त्याची जशी अवस्था होते तशीच माझीहि झाली.



9

माझी मनःस्थिति ' स्वतः'च्या लक्षांत आली असावी.

' हा माऊंट ऑफ् ज्युपिटर ' असें म्हणून आपल्या हाताच्या आंगठ्याशेजारच्या बोटाखालचा उंचवटा दाखविला, ' यावरून ही रेषा निघाली आहे ' असं म्हणून करांगुलीखालच्या उंचवट्याकडे जाणारी रेषा दाखविली. ' अशी रेषा ज्यांच्या हातावर असते त्यांचा स्वभाव कसा असतो हें मी तुला सांगितलंच. तुझ्या हातावर अर्थातच ही रेषा नसली पाहिजे. तेव्हां सध्यांसारखे खेदकारक प्रसंग आपल्या आयुष्यांत नेहमीं येणार हें ठरल्यासारखं आहे. '

स्वारीला या हस्तसामुद्रिकाच्या वेडानं पछाडलेलं पाहून तर मी अधिकच गोंधळून गेलें. पण क्षणांतच माझ्या मनांत एक कल्पना आली आणि—

' हें पाहिलंत का ? माझ्या हातावर देखील अगदीं तश्शी रेषा आहे ! ' मी उद्गारलें.

' पाहूं, पाहूं ! ' म्हणून माझा हात आपल्या हातीं घ्यायचा झाला; पण हातावरच्या रेषा कधींच पाहणं झालं नाहीं. मात्र त्या वेळीं हातीं घेतलेला हात किती वेळ तसाच होता हें आतां आठवलं म्हणजे साध्याच प्रसंगाचं अजून हंसूं लोटल्यावांचून राहात नाहीं !

' मनोहर'—नोव्हेंबर १९३५

## आमची खानावळ : १८

अहो, भाकरी कसल्या त्या ? रोटच होते ते. हत्तीला चारण्याकरतां करतात ना, तशा तऱ्हेचे. याबद्दल तम्मण्णाचें आणि आमचें भांडणहि झालें होतें चारदोन वेळेला. एकदां तर आम्ही तम्मण्णाची खानावळ सोडून दुसऱ्या एका खानावळींत गेलों. पण म्हणतात ना, ' आगींतून फुफाट्यांत पडला,' तसा प्रकार झाला आमचा. तम्मण्णाच्या खानावळींत फक्त भाकरीच तेवढ्या वाईट असत. या नवीन ' वैकुंठ-भोजनालयां'त सर्वच जिन्नस वाईट होते ! तेव्हां ' भीक नको पण कुत्रा आवर ' या न्यायानें आम्ही चुकले फकीर फिरून तम्मण्णाच्या मशिदींत परत आलों. तम्मण्णा शरीरानेंच नव्हे तर मनानेंहि विशाल होता-निदान तसें नाटक करण्यांत तरी तो कुशल होता-याचा प्रत्यय या वेळीं आम्हांस चांगलाच आला. आम्हीं दुसऱ्या खाणावळींत गेलों होतों ही

गोष्ट तम्मण्णाला माहीत होती. पण जसें कांहीं आपण त्या गांवचेच नाहीं असें दाखवून तम्मण्णानें आमचें स्वागत केलें. आणि पुढच्या सर्व बोलण्यात आम्ही मध्यंतरीं कुठे तरी गांवीं गेलों होतों व आतां परत आलों अशीच आपली समजूत असल्याचं त्यानें दाखविलें. आम्हींहि त्याची ही समजूत काढून टाकण्याचा प्रयत्न केला नाहीं.

फिरून आमचा पूर्ववत् कार्यक्रम सुरू झाला. पहिला भात होतो न होतो तोंच तम्मण्णा आपल्या 'नाजुक' भाकरीचा लगदा धपकन् आमच्या पानांत टाकून जात असे. त्यांतला निम्मा भाग कसाबसा घशाखालीं घातला कीं आमचें पोट भरून येत असे; आणि भरल्या पोटावर समाधानाचे ढेकर न सोडतां मनांतल्या मनांत तम्मण्णाला हजार शिवी मोजीत आम्ही आपोष्णी घेत असूं.

पण असा कार्यक्रम तरी किती दिवस चालणार? माणसाच्या सहन-शक्तीला कांहीं मर्यादा आहे कीं नाहीं? मेंबर लोकांचीं पोटें म्हणजे कांहीं तम्मण्णानें केलेल्या भाकरी ठेवण्याचीं फडताळें आहेत थोडींच! किती झाले तरी मनुष्याचीं पोटें तीं! त्यांनीं बिचाऱ्यांनीं किती हाल सोसायचे? त्यातून आम्हां दोघांचीं पोटें मुळचींच थोडीं तक्रारखोर असल्याने या सत-तच्या जुलुमाविरुद्ध त्यांनीं फारच काहूर उठविलें आणि फिरून एकदां आमची आणि तम्मण्णाची चांगलीच जुंपली. तम्मण्णाचे मदतनीस पळ्या-झाऱ्यानिशीं बाहेर धांवत आले. कांहीं मेंबरलोकाची कुमक आम्हांलाहि मिळाली आणि प्रकरण हातघाईवर येणार असें दिसूं लागलें. पण—

तम्मण्णा किती झाला तरी आमचा अन्नदाता. आणि आम्ही किती झालों तरी त्याचे उदार आश्रयदाते! तेव्हां प्रसंग फक्त तोंडावरच निभा-वला आणि आम्ही गुरगुरत बाहेर पडून रस्त्याला लागलों.

तोंच एक नम्र आवाज आमच्या कानाशीं लागला—

'साहेब!'

आम्हीं विस्मयानें त्या गृहस्थाकडे पाहिलें. चटकन् ओळख पटली.

नुक्ताच जो समारंभ उरकला त्यांत सहानुभूतीनें आमच्याकडे पहात असलेला गृहस्थ होता तो.

‘ साहेब, माझी एक गोष्ट आपण ऐकाल ? ’ तो गृहस्थ म्हणाला.

‘ सांग पाहूं. मात्र ती लघुकथा असावी—म्हणजे थोडक्यांत आटपणारी. ’ मी म्हणालों, आणि माझ्या बोलण्यावर माझे परम स्नेही कुशाभाऊ एकवार हंसले.

‘ माझी गोष्ट म्हणजे एवढीच कीं या खाणावळींत आपण जाऊं नका. ’ तो नम्र आवाज उमटला.

गंमत वाटली आम्हांला त्याच्या बोलण्याची. आमच्या पाटाला पाट लावून बसते स्वारी आणि आम्हांला उपदेश करते कीं म्हणे या खानावळींत जाऊं नका !

‘ अहो, या खानावळींत जाऊं नका तर जायचं कुठं ? त्या ह्याच्या वैकुंठ–भोजनालयांत गेलों तर चीतच झालों अगदीं. ’

‘ पण साहेब, माझी गोष्ट संपू द्या तरी. त्या खानावळींत जाऊं नका असं सांगितल्यावर कुठल्या खानावळींत जा, हें सांगण्याची जबाबदारीहि माझ्यावर आलीच. ’

आम्ही दोघांनीं आमचे कान टवकारले.

—‘ आणि ती जबाबदारी मी आतां पार पाडतों. ’ तो गृहस्थ बोलूं लागला. ‘ आपल्याला इथलं मॉडेल हायस्कूल माहीत असेलच ? ’

‘ वा ! हें काय विचारतां ? आम्ही तर मॉडेल हायस्कूलचे माजी विद्यार्थी. ’

‘ मॉडेल हायस्कूलचं एक वसतिगृह आहे हेंहि माहीत असेल आपल्याला ? ’

‘ वा ! आम्ही तर त्या वसतिगृहांतच होतों. ’

‘ त्या वसतिगृहाचा एक क्लब असतो हें पण आपल्याला माहीत असेलच ? ’

'असले प्रश्न विचारून तुम्ही आमची थट्टा करूं पहात असाल तर आम्ही आपले पुढेंच जातों कसे ! अगोदरच आमचं डोकं भडकलेलं आहे आणि त्यांत तुम्ही नका रॉकेल ओतूं.'

'छे ! साहेब, आपली थट्टा कशी करेन मी?' मला एक मुद्याची गोष्ट सांगायची आहे, त्याकरतां ही लांबड लावली – माफ करा.'

'मग आतां लौकर ती सांगून मोकळे व्हा कसे.'

'मॉडेल हायस्कूलच्या वसतिगृहांतील क्लबामध्यें कांहीं दिवस मीं आचाऱ्याचं काम केलं आहे. पण माझी नेमणूक टेंपरवारी होती. ती मुदत संपली आणि मी मोकळा झालों. आतां एक नवीन मालकीची खाणावळ काढण्याचा विचार आहे माझा. आपल्या सारख्यांनीं उदार आश्रय दिला तर...'

'मोठ्या आनंदानं. तम्मण्णाच्या रोटांचा असा कंटाळा आला आहे कीं एखाद्या ह्लसोबानं जरी खाणावळ काढली तरी आम्ही तिचे मेंबर व्हायला तयार आहोंत. आणि तुम्ही तर काय, अनुभविक–तरबेज गृहस्थ !—बरं, नाव काय तुमचं ?'

'गुंडू आचारी म्हणतात मला.'

कुशाभाऊ व मी गुंडूच्या नव्या खाणावळीचे पहिले आश्रयदाते झालों. पण फक्त दोन आश्रयदात्याच्या उदारपणावर सबंध खाणावळ चालविणें शक्य नव्हतें. याकरतां नवे मेंबर्स कसे मिळतील या गोष्टीचा विचार आम्हा तिघांच्याहि डोक्यांत घोळूं लागला.

पण या गोष्टीचा आम्ही 'सीरिअसली' विचार करीत नव्हतों म्हणून म्हणा किंवा आणखी कांहीं म्हणा, पण आठ दिवस झाले तरी आमच्या डोक्यांतून कांहींच बाहेर पडेना. मध्यंतरीं गुंडूच्या अन्नाचा रुचिपालट होत गेला आणि आठव्या दिवशीं तर आमच्या पानांत पडलेले सर्वच जिन्नस थेट वैकुंठ–भोजनालयाच्या तोडीचे झाले. आम्ही गप्प बसतों याचा फायदा गुंडूनं घेतला असें आमच्या मनानें घेतलें. जेवण

झाल्यावर खिशांतील सुपारी तोंडांत टाकून ती चघळीत कुशाभाऊंनीं गुंडूस विचारलें—

'गुंडोपंत, तुम्ही आंबेमोहोर तांदूळ वापरण्याचं वचन दिलं होतं अन् आजच्या भाताला बिलकूल वास नव्हता, हें कसं?'

'काय म्हणतां? बिलकूल वास नव्हता?'

'वास नव्हतां एवढंच नव्हे तर वास नाहीं. हवे तर तुम्हीं स्वतःच परीक्षा करून पहा.'

'असेल! असेल!! एक चूक झाली खरी माझ्याकडून.'

'ती कोणती बुवा?'

'आधणांत ओतण्यापूर्वी मीं तांदूळ धुतले ना, त्या वेळीं सगळा वास धुऊन गेला असावा!'

पोष्टाच्या पेटीसारखीं तोंडें करून आम्ही दोघेही बाहेर पडलों.

दुसऱ्या दिवशीं जो भात पानांत पडला त्याला सुवास होता खरा पण एक एक शीत म्हणजे चुरमुऱ्यासारखें! कांहीं केल्या तो भात आमच्या घशाखालीं उतरेना. आम्ही दोघेच मेंबर्स असल्यानें भोजनोत्तर तक्रार करावी, पंक्तींत करूं नये, असले नियम पाळण्याची कांहींच जरूर नव्हती. इतक्यांत खुद्द गुंडूनेंच विचारलें—

'काय भाऊसाहेब, आजच्या भाताला सुगंध आहे ना?'

'सुगंध आहे, पण हा कांहीं आंबेमोहोर तांदूळ नव्हे.'

'नव्हेच नाहीं तरी.' गुंडू म्हणाला.

'आंबेमोहोर कां नाहीं वापरीत?' कुशाभाऊंनीं विचारलें.

'रुचिपालट होण्यासाठीं—त्यांतून आजचा रेडेमुसळी तांदूळ तर फारच रुचकर.'

आचारी असला तरी गुंडू आमची डाळ बिलकूल शिजूं देणार नाहीं हें आम्हीं साफ ओळखलें.

दुसरे दिवशीं तर पानांत रंगून तांदळाचा भात येऊन बसला. या

गोष्टीबद्दल गुंडूस जाब विचारण्यासाठीं कुशाभाऊंचे ओठ स्फुरूं लागले, तोंच गुंडू काकुळतीच्या स्वरांत म्हणाला, 'साहेब–बोलण्याची तसदी घेऊं नका. तुमच्यासारख्या दोनच दोन मेंबरांवर आम्ही धंदा कसा करायचा? आणखी चारदोन दिवस मेंबर लोकांची संख्या वाढली नाहीं तर धंदा बंद करण्याचा माझा विचार आहे.'

झालें; त्या छोट्या भाषणानें आम्ही थंड झालों. गुंडूनें धंदा बंद केल्यावर नाक मुठींत घेऊन तम्मण्णाकडे गेल्याशिवाय गत्यंतर नाहीं, तम्मण्णा कुजकें बोलल्याशिवाय राहणार नाहीं, वगैरे वगैरे प्रसंग आमच्या मनःचक्षूंसमोर दिसूं लागले आणि पानांत पडलेला रंगून तांदळाचा भातच आंबेमोहोर तांदळाचा आहे असा भाव ठेवून खालीं पहात आम्हीं आमचीं जेवणें आटोपलीं.

पण आम्हांस चांगलें जेवण हवें असेल तर गुंडूच्या खाणावळीचे मेंबर्स वाढवून दिल्याखेरीज गत्यंतर नाहीं हें सूर्यप्रकाशाइतकें स्पष्ट असल्यानें जेवून बाहेर पडता पडतां प्रस्तुत गोष्टीसंबंधीं विचार करण्यासाठीं आमच्या खोलीकडे त्यानें संध्याकाळीं सहा वाजतां यावें असें त्यांस सांगून आम्ही बाहेर पडलों.

माझी खोली आणि कुशाभाऊंची खोली अशा दोन्ही खोल्या अगदीं शेजारीं शेजारीं होत्या. पण ज्या ठिकाणीं आम्हास काम करावयाचें असे तीं क्षेत्रें गांवाच्या दोन टोंकास होतीं. कुशाभाऊ ज्या ऑफिसांत काम करीत तें ऑफिस गांवाच्या पश्चिमेस होतें आणि मी ज्या शाळेंत शिक्षकाचें काम करी ती शाळा गांवाच्या पूर्वेस होती. पण हीं दोन टोकें आम्हा उभय स्नेह्यांच्या रूपानें सकाळ–संध्याकाळ एकत्र येत, आणि तीं एकत्र आल्यानंतर जो कांहीं हास्यविनोदाचा आणि मौजेचा सुगंध दरवळे त्याची लज्जत कांहीं और असे.

   

त्या दिवशीं संध्याकाळीं हीं दोन टोकें नुक्तीच एकत्र आलीं होतीं

आणि हास्यविनोदास नुक्तेंच तोंड लागलें होतें. तोंच गुंडूची स्वारी हजर झाली.

गुंडू येतांच संभाषणाचा रंग बदलला. संभाषणावर गांभीर्य पसरलें. खाणावळीचे आश्रयदाते वाढविण्यास काय करावें ? वर्तमानपत्रात जाहिरात द्यावी, ही कल्पना कुशाभाऊंच्या आणि माझ्या मनांत एकदमच आली आणि आम्ही दोघांनीं ती एकदमच उच्चारली. गुंडूलाहि ती कल्पना पसंत पडली आणि आम्ही त्रिवर्ग जाहिरातीचा मसुदा तयार करण्यास बसलों. थोडक्या खर्चात पण अत्यंत परिणामकारक अशी जाहिरात वठली पाहिजे याबद्दल मतभेद नव्हता. पण ती जाहिरात परिणामकारक कशी करावी याबद्दल मात्र सारखा मतभेद होऊं लागला. अखेर गुंडूचा एक ब्लॉक देऊन त्याच्या चारी बाजूस 'सुप्रसिद्ध गुंडू आचारी यांचें भोजनालय, पदवीधरांच्या खास आश्रयाखाली सुरू झालें. तरी ग्राहकांनीं त्वरा करावी.' असा मजकूर बसवावा असें ठरलें. गुंडूचा ब्लॉक त्याच्या कोट–रुमालानिशीं द्यावा, कीं त्याच्या अंगावरच्या एकुलत्या पंचानिशीं द्यावा याबद्दलहि माझा आणि कुशाभाऊंचा बराच वादविवाद झाला. पण अखेर कुशाभाऊंनीं माझ्याच मतास मान्यता दिली आणि आपला पंचा व आपलीं आयुधें यांनीं सज्ज असलेल्या उघडबंब गुंडूचा ब्लॉक द्यावा असें ठरलें. झारा, पळी व पंचा या आयुधांनिशी आपलें चित्र प्रसिद्ध करण्याबद्दल गुंडूची कांहींच आडकाठी नव्हती. पण चित्रासभोंवती जो मजकूर घालावयाचा त्याबद्दल मात्र त्यानें थोडी नापसंती दर्शविली. पदवीधर असा मोघम उल्लेख न करतां आमचीं नांवें छापावींत असें त्याचें मत होतें. पण आम्हीं दोघांनीं हें मत खोडून काढलें. शेवटीं एका नव्या कागदावर जाहिरातीचा मसुदा लिहून काढला व तो गुंडूच्या हातीं देऊन त्यास आम्हीं आमच्या गांवीं निघणाऱ्या '**सनातन–धर्म–प्रकाश**' नामक वर्तमानपत्राच्या कचेरीकडे पाठवून दिलें.

त्यानंतर दोन दिवसांची गोष्ट. सोमवार होता त्या दिवशीं. वेळ

सकाळची. पण कुशाभाऊंना बाहेर थोडें काम होतें. त्यांनी मला बाहेर येता कां म्हणून विचारलें. मलाहि खोलींत बसण्याचा कंटाळा आला होता म्हणून मी ‘ येतों ’ म्हणालों, आणि लागलीच आम्ही मित्रद्वय बाहेर पडलों. कुशाभाऊंचें ज्या गृहस्थाच्या घरीं काम होतें त्या गृहस्थाच्या घरीं जायचें म्हणजे सबंध मंडई आणि बाजारपेठ तुडवीत गेल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. त्याप्रमाणें आम्ही चाललों असतां एक चमत्कारिक अनुभव आम्हांला येऊं लागला. कुशाभाऊंच्या ऑफिसांतला एकादा कारकून, फार काय एकादा शिपाई भेटला तरी तो कुशाभाऊंकडे पाहून फिदी फिदी हंसे आणि पुढें चालूं लागे. आमच्या शाळेंतील विद्यार्थी प्रगतिपुस्तकांतल्या आठव्या नियमाप्रमाणें मला कधीं कधीं रस्त्यावर नमस्कार करीत पण त्या दिवशीं मला इतके विद्यार्थी भेटले तरी एकानेंहि नमस्कार तर केला नाहींच, पण निर्लज्जपणानें माझ्याकडे पाहून दांत विचकण्यासहि कमी केलें नाहीं. आम्हांला आमच्या कपड्यांची शंका आली, म्हणून एकदां कपडे ठीक आहेत किंवा नाहींत हें पाहिलें. टोपीची शंका आली तेव्हां टोपी डोक्यावर आहे, एवढेंच नव्हे तर तिची शिवण मागच्या बाजूस आहे, याचीहि आम्हीं खात्री करून घेतली. तोंडाला कांहीं काळें लागलें असावें अशी शंका आली म्हणून एका पानपट्टीवाल्याच्या दुकानापुढें घुटमळून दुकानांतल्या आरशांत चेहरा पाहून घेतला. आरशांत तोंडाला काळें तर फासलेलें दिसलें नाहींच पण उलट चेहरा मात्र पांढरा फटफटीत दिसला. मग इतके लोक दांत कां विचकत असावेत याचा मात्र कांहींच उलगडा होईना. आम्ही ठरलेल्या ठिकाणीं गेलों, काम उरकून गेल्या रस्त्यानें परत आलों, तरी लोकांचा आमच्याकडे पाहून हसण्याचा क्रम सारखा सुरू होता.

खोलींत परत आलों, तेव्हां साडे दहा वाजून गेले होते. आम्ही गडबडीनें गुंडूच्या भोजनालयाकडे निघालों. आम्ही तिथें पोंचलों तेव्हां एक चमत्कारिक दृश्य आम्हांस दिसलें. कुशाभाऊंच्या कचेरींतली कांहीं कार-

कून मंडळी आणि आमच्या शाळेतील कांहीं विद्यार्थी त्या ठिकाणीं अगोदरच आले होते आणि त्यांनीं गुंडूच्या भोजनालयाचे आश्रयदाते होण्याची घडपड चालविली होती. त्यांचा घोळका पाहतांच आमच्या जाहिरातीची गोळी अचुक लागली याबद्दल आम्हाला कांहींच शंका राहिली नाहीं. आणि विजयी मुद्रेनें आम्ही पानावर बसलों. आमच्या चहूंबाजूस कुशाभाऊंच्या ऑफिसांतील कारकुनाच्या आणि आमच्या शाळेंतील विद्यार्थ्यांच्या पंक्ति बसलेल्या होत्या.

'बाकी आपण जें सामाजिक धैर्य दाखविलंत त्याबद्दल खरोखरीच आपलं अभिनंदन केलं पाहिजे.' कुशाभाऊंच्या कचेरींतील एक खवचट गृहस्थ म्हणाले.

'सामाजिक धैर्य? कसलं धैर्य?' कुशाभाऊंनीं गोंधळून विचारलें.

'वा! जसं कांहीं आपल्याला ठाऊकच नाहीं! कमाल केलीत बुवा कुशाभाऊ तुम्ही!!' ते खवचट गृहस्थ म्हणाले. 'पण याचं सारं श्रेय तुम्हालाच फक्त नाहीं मिळायचं. तुमच्या सहकाऱ्यांनाहि त्याचा योग्य तो वांटा मिळाला पाहिजे–' आणि यावर त्या गृहस्थानें माझ्याकडे अशा कांहीं चमत्कारिक नजरेनें पाहिलें कीं मी गोंधळूनच गेलों. माझी ही स्थिती माझ्या पलीकडे बसलेल्या विद्यार्थ्यांच्या लक्षांत आली असावी; कारण ते एकदम खो खो हंसूं लागले. सर्वांच्या हास्याचे इमले चढत होते आणि आम्हां मित्रद्वयांच्या मनाचा मात्र चुराडा होत होता. तोंच गुंडूच्या आजोबाशाही घड्याळानें अकरा वाजल्याची वर्दी दिली. तेव्हां ते कां हंसतात याचा खुलासा करून घेण्याच्या नादांत न पडतां आम्ही आपोष्णी घेऊन पानांवरून उठलों.

तिसरी घंटा झाली आणि मी वर्गांत पाऊल ठेवलें. पुस्तक उघडून मीं वाचावयास सुरवात केली. मध्येंच एकदां मी विद्यार्थ्यांच्याकडे पाहिलें. सर्वांच्या तोंडावर हंसूं कसें तुंबून राहिलें होतें! बंधारा फुटण्याचाच काय तो अवकाश. आणि हा बंधाराहि लौकरच फुटला.

एका कठिण शब्दाचा अर्थ फळ्यावर लिहून दाखविण्यासाठीं मी उठून फळ्याकडे वळलों मात्र—

एकदम मोठा हंशा—

फळ्यावर चिकटविलेलें गुंडूचें चित्र—

चित्राच्या खालीं माझें छापील नांव—

जणुं कांहीं मी म्हणजेच गुंडू आचारी—

आणि गुंडूचें भोजनालय म्हणजे —

आमचीच खाणावळ !—

थंड होऊन गेलों मी !

नव्हे, गरम झालों.

—मुलांनीं हंसूं नये तर काय रडावें ?

—पण हें असें झालें तरीं कसें ?

मी विमनस्क होऊन परत खुर्चीवर बसलों. विद्यार्थी मधून मधून हंसत होते. मी वाचीत होतों. स्पष्टीकरण करीत होतों. पण मी काय बोलत होतों हें माझें मलाच कळत नव्हतें. विद्यार्थ्यांना कळत होतें कीं नव्हतें कोण जाणें! अशा स्थितींत एकदांचा तास संपला. तास संपतांच वर्गांत घडलेला प्रकार शाळेंत सर्वांना कळून चुकला. अध्यापकांच्या खोलींत मी येतों न येतों तोंच तिथें देखील सर्वत्र हंसणारे चेहरेच माझ्या नजरेस पडले. दुनियेनें हंसावें आणि मीं मात्र दुःखी असावें ! कारण काय याला ? कुणाची चूक ही ? माझें डोकें तप्त झालें होतें. एवढा वाईट दिवस माझ्या हयातींत तो पहिलाच होता. अखेर एकदां शाळा सुटली आणि क्षुब्ध अंतःकरणानें मी एकदांचें माझें निवासस्थान जवळ केलें.

मी खोलींत येऊन आरामखुर्चीवर पडतों न पडतों तोंच कुशाभाऊहि ऑफिसमधून परत आले. त्यांचा चेहरा अगदीं म्लान दिसला. आल्यावर हंसूं खेळूं लागणारे कुशाभाऊ आज पांचदहा मिनिटें अगदीं स्तब्धच होते. अखेर मीं विचारलें—

' काय कुशाभाऊ, आजारी कां आहांत ? '

' आजारी असतों तर बरं झालं असतं. '

' म्हणजे काय ? आजारीपणापेक्षांहि कांहीं वाईट घडून आलं ? '

' होय. '

' काय बरं ? '

' अहो, गुंडूच्या ब्लॉकच्यावर माझं नांव छापलेलं ! जसा कांहीं मी म्हणाजेच गुंडू आचारी ! एका राजश्रींनीं गुंडूच्या ब्लॉकसकट माझं नांव कातरून काढून तो कागद माझ्या टेबलावर चिकटवून ठेवला होता. ऑफिसांतल्या प्रत्येकाला ही हकीगत कळली आणि प्रत्येक जण माझ्याकडे पाहून हसूं लागला. '

' थेट असाच अनुभव आला मला ! फरक एवढाच की गुंडूच्या चित्राखालीं माझं नांव छापलेलं आहे. ' मी म्हणालों.

' म्हणतां काय ? खरंच असं झालं ? '

' खोटं कशाला सांगूं ? '

' मग आतांच चला जाऊं आपण त्या ' **सनातन–धर्म–प्रकाश** 'च्या संपादकाकडे. '

आम्ही दोघेहि त्या संपादकाकडे आलों. तो म्हणाला—

' जाहिरात देण्यासाठी जो मनुष्य माझ्याकडे आला होता, त्यानं सांगितलं कीं ब्लॉकवरच्या बाजूस ' **श्रीयुत कुशाभाऊ चिटणीस, बी. ए.** ' हें नांव टाका अन् खालच्या बाजूस ' **श्रीयुत गजाभाऊ ढेकणे, बी. ए. बी. टी.** ' हें नांव टाका. त्याप्रमाणं आम्हीं नांव टाकलीं आहेत. त्या गृहस्थाला तुम्ही विचारा. मला काय विचारता ? '

' **सनातन–धर्म–प्रकाश** 'च्या कचेरींतून आम्ही निघालों ते तडक गुंडू आचाऱ्याकडे आलों. पहातों तों काय ? गुंडूच्या भोजनालयास कुलूप. शेजारच्या गृहस्थाकडून माहिती मिळाली कीं गुंडू सर्व सामान आवरून मोटार स्टँडवर गेला आहे. आम्ही तसेंच मोटार स्टँडवर गेलों. तिथें

कळलें कीं मोटार जाऊन पंधरावीस मिनिटें झालीं.

या सगळ्या भानगडींत साडेसात केव्हां वाजले तेच आमच्या लक्षांत आलें नाहीं. आमच्या पोटांत तर कावळे ओरडूं लागले. तम्मण्णाच्या गुत्याकडे परत वळल्याखेरीज आम्हाला गत्यंतरच राहिलें नाहीं.

आमचें स्वागत करण्यासाठींच कीं काय कोण जाणे तम्मणा दारांतच उभा होता. तो म्हणाला,

'या मास्तरसाहेब, या भाऊसाहेब,—काय गुंडूनं अखेर दगा दिला वाटतं? तुम्ही जाहिरात तर खूप केलीत बुवा! अन् नशिबानं गुंडूला मेंबरलोकहि भरपूर मिळाले. पण एवढ्या मेंबरलोकांची व्यवस्था कशी ठेवावी हें कळण्याची अक्कल असायला पाहिजे ना? ही अक्कल आमच्या-जवळ आहे म्हणून तर आज सतत तीस वर्षे धंदा चालविला आहे आम्हीं......'

तम्मण्णा जें जें बोलला तें तें ऐकून घेऊन आम्ही आंत जाऊन पाना-वर बसलों. थोड्या वेळानें तम्मण्णा आपल्या 'नाजुक' भाकरीचा लगदा आमच्या पानांत धपकन् टाकून गेला. डोळे मिटून आम्ही तो घशा-खालीं ढकलूं लागलों.

'यशवंत'—डिसेंबर १९३६.

---

## मनाचें धुराडें : १९

माणसाच्या मनाला विसाव्याचं म्हणून कांहीं साधन असावं लागतं आणि असं साधन असेल तरच माणसाच्या मनाची तब्येत निकोप राहते. आतां हें साधन महत्वाचं असलं पाहिजे, किंमतीचं असलं पाहिजे, असं मात्र मुळींच नाहीं. विसाव्याचं साधन म्हणून कुणी दारूचं व्यसन जडवून घेतात आणि घरादाराची राखरांगोळी करतात, तर शेजाऱ्या-पाजाऱ्यांच्या निंदा–नकला करणं हें बिनखर्ची साधनच कुणाचं अतियश आवडतं असतं. स्वयंपाकघराला जसं धुराडं, तसं माणसाच्या मनांतील धूर निघून जायला हें विसाव्याचं साधन. मनाला हें धुराडं नसेल तर मनाचा कोंडमारा होतो, कुचंबणा होते, तळमळ होते.

गरिबाच्या मनाच्या विसाव्याचं हें साधन खर्चाचं असणं म्हणजे कार-कुनानं रत्नजडित मुठीची तरवार कमरेला लटकावून फिरण्यासारखंच नव्हे का ? त्या गरीब माणसाच्या परिस्थितीला तें खर्चाचं साधन विसंग-

तहि दिसतं, शिवाय तें साधन नेहमीं जवळ बाळगायला गरिबांजवळ पैसा तरी कुठून असणार ? माझ्या इतर आयुष्यांत मी कितीहि कमनशिबी असलों तरी एका बाबतींत मी अगदीं सुदैवी होतों. आमच्या विसाव्याचीं साधनं—आमच्या मनाचीं धुराडीं—जवळ जवळ बिनखर्चीं होतीं. कधींकधीं नाकातोंडांतून सिगारेटचा धूर सोडणं हेंच माझ्या मनाचं धुराडं होतं. अन् कधींमधी शेजाऱ्यांची नक्कल किंवा निंदा करणं हें आमच्या सौभाग्यवतीच्या मनाचं धुराडं होतं. या धुराड्यांतून आमच्या मनांतील धूर व्यवस्थितपणें निघून गेला, कीं रोजच्या आयुष्यांतील सुखदुःखाशीं आम्ही तन्मय होऊन जात असूं आणि आमच्या घरची जरी गरिबी असली तरी ती आम्हांला मुळींच बोंचत नसे.

'नेहमीं नेहमीं काटकसरच तीं काय करायची ? माणसाच्या आयुष्यांत थोडासुद्धां आराम नको कां ?'—सौ. वती.

'काटकसर !' 'आराम'! गरिबी बोंचली वाटतं !—

मनाचं धुराडं नादुरुस्त झालं कीं काय —

त्यानंतर तें धुराड कुठं नादुरुस्त झालं तें मी लक्षपूर्वक पाहूं लागलों.

एकदोन दिवसांत माझ्या लक्षात आल, कीं शेजारच्या शांताबाई आमच्याकडे बसायला मुळींच येईनाशा झाल्या आहेत.

'आतांशा दोन दिवसांत शांताबाई नाहींत कुठं आल्या आपल्याकडे ?' सहज प्रश्न विचारावा अशा आविर्भावानें मी बोललों.

'वरून गोड बोलायचं नी आंतून वीष पेरायचं ! अशीं माणसं घरीं न आली तर चालतील.'—सौ. वती.

'काय म्हणतां ? एवढं अधम कृत्य केलं त्यांनीं ?' मीं थट्टेच्या स्वरांत विचारले.

'तुम्हाला काय, दुसऱ्याचे प्राण जात असले तरी थट्टा सुचायची !'

'बरं—थट्टा राहिली. आतां गंभीरपणानं विचारतों—काय बेबनाव झाला आहे सध्यां ?'

त्यानंतर, शांताबाईनं आमच्या सौ. वतीची नक्कल आणि निंदा शेजाऱ्याच्या सावित्रीबाईजवळ कशी केली आणि त्या नक्कल–निंदेबद्दल सौ. वतीजवळ न बोलण्याविषयीं शांताबाईनं सावित्रीबाईला कसं बजावलं, आणि इतकं बजावलं असूनहि सावित्रीबाईनं शांताबाईकृत निंदा, अधिक आपल्या पदरचं कांहीं तिखटमीठ मिळून बनविलेलं कडबोळं आमच्या सौ. वतीपुढें कसं वाढलं, आणि त्या कडबोळ्याच्या उग्र वासानं आमच्या सौ. वतीचं डोकं कसं उठलं, इत्यादि इत्यादि गोष्टींचा सविस्तर पाढा मला ऐकायला मिळाला.

यावर उघड बोलण्यानं फक्त भांडणास निमित्त मिळेल हें ओळखून मी मनांतल्या मनांत एवढेंच म्हणालों—' आमच्या घरांत दुसऱ्याची निंदा किंवा नक्कल कधींच होत नसेल जणुं कांहीं ! '—

त्यानंतर शांताबाईचं आमच्या घरचं जाणंयेणं, फार काय बोलणंचालणं सुद्धां बंद झालं.

जवळ जवळ दोन महिने हा प्रकार चालला होता.

एके दिवशीं सावित्रीबाईच्या यजमानांना बदलीचा हुकूम आला आणि त्या बिऱ्हाड सोडून निघून गेल्या.

आमच्या सौ. वतीचं आणखी एक विसाव्याचं ठिकाण नाहींसं झालं.

तिच्या मनाचं धुराडं बंद झालं. त्याबरोबर मनाचा अस्वस्थपणा वाढला. सहनशीलता कमी होऊं लागली, धुसपूस सुरू झाली. आमच्या गृहसौख्यांत अंतर पडत चाललं. कचेरीच्या जबाबदारीच्या काळजीबरोबर ही दुसरी एक काळजी माझ्या मनांत धिंगाणा घालूं लागली.

असा प्रकारहि दोन महिने चालला. सौ. वतीनं घराला कैदखान्याचं स्वरूप आणलं होतं आणि या कैदखान्यांत ती स्वतःलाच कैद करून घेत असे. त्यामुळें कैद्यांच्या तोंडावर दिसणारी खिन्नता तिच्या तोंडावरहि थोडीबहुत दिसूं लागली.

दोन महिने झाले तरी सावित्रीबाई ज्या जागेंत राहात असत त्या

जागेला बिऱ्हाड आलं नव्हतं. प्राप्ति बुडत होती म्हणून आमचे घर-मालकहि [ यांना आईबाप, बहीणभाऊ, बायकापोरें कोणताच मोहपाश नव्हता. मात्र पैशाच्या मोहपाशांत ते इतके जखडले गेले होते कीं जगांतील सर्व मोहपाशांची शक्ति त्या एका मोहपाशांत एकवटली असावी असं माझ्यासारख्या तिऱ्हाइताला वाटे.] आतांशा खिन्नवदन दिसत होते.

आमच्या सौ. वतीप्रमाणें शांताबाईंचाहि कोंडमारा होत होता. त्यांनीहि स्वतःला घरांतच जखडून घेतलं होतं. त्यामुळें त्याहि अलीकडे खिन्न दिसत होत्या.

आणि मी ?—मी तरी या खिन्न वातावरणांतून कसला सुटणार होतों ? घरांतल्या खिन्नतेच्या आणि अस्वस्थतेच्या काळोखांत मीहि गडप होत चाललों होतों. फक्त त्या कभिन्न काळोखांत माझ्या तोंडांत जळणारी सिगारेटच काय ती मला प्रकाशाची साक्ष देत होती.

  

संध्याकाळीं सहाच्या सुमाराला मी कचेरींतून घरीं परत आलों.. नेहमीप्रमाणं दार बंद होतं. दारावर थाप मारणार तोंच आंतून शांताबाईंचा आवाज कानांवर आला. मी विस्मयचकित झालों. आणि दारावर थाप न मारतां क्षणभर तसाच उभा राहिलों.

त्या क्षणीं पुढील संवाद कानांवर येऊं लागला—

' काय हो, ती बाई तरी ! अन् तीं मुलं कां भुतं ? येऊन दोन दिवस झाले नाहींत तर सगळा वाडा डोक्यावर घेतला त्यांनीं ? ' —शांताबाई

' अन् त्या मुलांची आई तरी काय हो ! भुतांची आईच शोभेल जशी. काय पण दांत, डोळे नी तोंड ! '—सौ. वती.

मीं दारावर थाप मारली. आंतून कडी नसल्यामुळं दार खाडकन् उघडलं. मी आलेला पाहतांच शांताबाई घाईघाईनं निघून गेल्या.

तथापि तेवढ्यांत त्यांनीं जें मागें वळून पाहिलं त्यावरून त्यांचा चेहरा अगदीं प्रसन्न दिसला.

आमच्या सौभाग्यवतीच्या चेहऱ्याकडे पाहिलं तेव्हां तिथेंहि शांताबाईच्या चेहऱ्यावरच्या प्रसन्नतेचंच प्रतिबिंब उमटलेलं दिसलं.

कारण ?—

—मनाचं धुराडं दुरुस्त झालं. सांचलेला धूर निघून जाऊं लागला. प्रसन्नतेची शुद्ध हवा खेळूं लागली.

मोकळ्या जागेला बिऱ्हाड मिळालं म्हणून आमच्या घरमालकांना आनंद झाला, आणि माझ्या गृहसौख्यांत मध्यंतरीं पडलेला बिघाड नाहींसा झाला म्हणून मला आनंद झाला.

'यशवंत' मे १९३८.

---

## शाळेकरितां : २०

कुणी गृहस्थ शाळेला देणगी देण्यासारखा आहे असें दिसलें आणि कन्यासदन हायस्कूलचे सुपरिंटेंडंट माधवराव गोरे त्या गृहस्थाकडे शाळेकरितां मदत मागण्यास गेले नाहींत, असें कधींच झालें नाहीं. देणगी देण्यासारख्या व्यक्तीच्या नांवाची नुसती कुणकूण जरी सुपरिंटेंडंटसाहेबांच्या कानांवर आली तरी शुभ्र रुमाल, सोनेरी फ्रेमचा चष्मा, शुभ्र छत्री, अशा थाटांत सुपरिंटेंडंटची स्वारी त्या व्यक्तीच्या घराभोंवतीं घिरट्या घालूं लागलीच.

वीस वर्षांपूर्वी त्या गांवीं कन्यासदन नांवाची मुलींना इंग्रजी पहिल्या तीन इयत्तांपर्यंत शिक्षण देणारी एक छोटी शाळा माधवरावांनीं सुरू केली. त्या वेळीं माधवराव तरुण होते. बी. ए. होते. त्यांनीं मनांत आणिलें असतें तर कुठल्याहि सरकारी खात्यांत चिकटून जाणें फारसें अवघड

नव्हतें. पण हा सुखाचा मार्ग डोळ्यांसमोर दिसत असतां, आणि बरोबरीचे लोक त्याच मार्गाचें अवलंबन करीत असतां माधवरावांनीं केवळ तत्त्वासाठीं त्या काळीं मुलींची एक इंग्रजी शाळा काढण्याचा उपद्व्याप (!) केला. त्या काळीं माधवराव हेच मास्तर, हेच सुपरिंटेंडंट, हेच कारकून, फार काय, शाळेच्या आवारांत असलेल्या छोट्या बागेचे हेच माळी, असा प्रकार होता.

या गोष्टीस आज वीस वर्षे झालीं होतीं. वीस वर्षांच्या या दीर्घ कालावधींत माधवरावांच्या छोट्या कन्यासदनाचें हायस्कुलांत रूपांतर झालें होतें. आरंभीं ज्या शाळेंत फक्त बारा मुली होत्या त्याच शाळेंत आज तीनशें मुली दिसूं लागल्या. माधवरावांच्या सहकाऱ्यांची संख्या वाढली. एका जुन्या वाड्यांतल्या दुमजल्यावर भरणारी शाळा आज स्वतःच्या मालकीच्या एका भव्य दुमजली इमारतींत भरूं लागली. अलीकडे तर कन्यासदन हें गांवचें एक भूषण समजलें जाऊं लागलें.

गेल्या वर्षी बाई जमनाबाईकडून संस्थेला जी देणगी मिळाली, तींतून शाळेस जोडून एक टुमदार व्यायामशाळा बांधण्यांत आली होती. व्यायामशाळेच्या योगानें विद्यार्थीनींच्या आरोग्याचें संवर्धन होत होतें; पण त्यांच्या मानसिक शक्तीचें संवर्धन कशानें होणार ? शाळेंत मास्तर शिकवितात ही गोष्ट खरी आहे, पण ज्ञानाचें खरें साधन म्हणजे वाचन. पण विद्यार्थिनींच्या वाचनाला उपयोगी पडेल असा ग्रंथसंग्रह शाळेंत कुठें होता ? ग्रंथसंग्रहाच्या अभावाची ही जाणीव माधवरावांच्या मनांतून केव्हांहि दूर झाली नाहीं. गेल्या वीस वर्षांत या दिशेनें त्यांना म्हणण्यासारखा प्रयत्नच करतां आला नाहीं. शाळेच्या मालकीची जागा, मालकीची इमारत, फर्निचर, असल्या अधिक जरुरीच्या गोष्टीकडेच लक्ष द्यावें लागल्यामुळें ग्रंथसंग्रहाच्या अभावाची जाणीव असून देखील तो प्रश्न मागें टाकण्याखेरीज त्यांना गत्यंतर नव्हतें. आज मात्र एका साध्या प्रसंगावरून तो प्रश्न त्यांच्यापुढें एकदम दत्त म्हणून उभा राहिला.

प्रसंग असा होता. सव्वा अकरा वाजण्याची वेळ. साडेअकराला शाळा सुरू व्हायची. माधवराव नुकतेच ऑफिसांत आले होते. सकाळीं आलेलें टपाल शिपायानें टेबलावर ठेविलें होतें. तें फोडून वाचण्यांत स्वारी मग्न होती. ऑफिसच्या बाहेर व्हरांड्यावर एका मोठ्या फळ्यावर आजच्या वादविवादक सभेसाठीं एक विषय लिहून ठेविला होता. शाळेंत वादविवादक सभा स्थापन झाल्याला आज बारा वर्षें झालीं असल्यामुळें आजच्या वादविवादाच्या प्रसंगाला विशेष महत्व आलें होतें. अध्यक्ष-स्थानीं एका विद्वान प्राध्यापकांची योजना झाली होती. वादविवादाचा विषय ' यांत्रिक सुधारणेपासून फायदे-तोटे ' असा होता. शाळेंतल्या पुष्कळ मुलींनीं वादविवादांत भाग घ्यायचें ठरविलें होतें. आणि आजच्या वादविवादात भाग घेऊं इच्छिणाऱ्या त्याचप्रमाणें आजच्या प्रसंगाबद्दल कुतूहल बाळगणाऱ्या अनेक मुलींचें एक टोळकें त्या फळ्यापुढें उभें राहिलें होतें. फळ्यावर लिहिलेल्या विषयाबद्दल कौतुक दाखवून आपाप-सांत हंसत खिदळत आणि या विषयावर कोण कशा बोलणार याचे बरे-वाईट तर्क लढवीत असतां जो दंगा होई तो थेट आंत सुपरिंटेंडंटच्या कानांवर येई. पण मुलांच्या शाळेपेक्षां मुलींच्या शाळेंत साहजिकच स्वातंत्र्य अधिक असल्यामुळें ऑफिसबाहेर उभ्या राहून गलबला कर-णाऱ्या मुलींना शिक्षा करावी असा विचारदेखील सुपरिंटेंडंटच्या मनांत येत नव्हता किंवा आंत सुपरिंटेंडंट आहेत तेव्हां दंगा करूं नये असा विचार मुलींच्याहि मनांत येत नव्हता.

टपालानें आलेलीं पत्रें वाचून झाल्यावर साहजिकच माधवरावांचें लक्ष व्हरांड्यांत चाललेल्या वादविवादाकडे गेलें. आपल्या शाळेंत एकादा ग्रंथसंग्रह असता तर आजच्या विषयावरचीं पुस्तकें मुलींकडून वाचवून घेऊन आजचा वादविवाद अधिक अर्थपूर्ण करणें आपल्याला शक्य नसतें कां झालें !—

आणि त्या विचारासरशीं उगीचच त्यांच्या मनाची तळमळ सुरू

झाली. कांहीं कांहीं माणसांचा स्वभावच असा चमत्कारिक असतो कीं कुठें उणीव जाणवली कीं ती दूर केल्याखेरीज त्यांच्या मनाला चैनच पडायचें नाहीं; आणि ती उणीव दूर करण्याचीं साधनें जवळ नसतील तर मग त्यांच्या मनाचे हाल विचारूंच नका. माधवराव याच वर्गांत जमा होण्यासारखे होते.

शिरस्त्याप्रमाणें साडेअकराला घंटा झाली. घंटेनंतर सामुदायिक प्रार्थना झाली. प्रार्थनेनंतर तास सुरू झाले. माधवरावही आपल्या तासावर गेले. पण वरून जरी ते आपल्या उद्योगांत मग्न आहेत असें दिसे तरी आंतून मात्र आज त्यांचें चित्त ठिकाणावर नव्हतें खरें.

चार तास झाल्यानंतर ठरलेल्या वेळीं प्रोफेसरसाहेब आले आणि लौकरच त्या दिवशींच्या कार्यक्रमाला सुरवात झाली. माधवरावांनीं आपल्या प्रास्ताविक भाषणांत वादविवादक सभेचा गेल्या बारा वर्षांचा त्रोटक इतिहास सांगितला आणि भाषणाच्या ओघांत वादविवादास अवश्य असा जो ग्रंथसंग्रह तो कसा उपलब्ध होईल याच विवंचनेंत सध्यां आपण आहोंत पण त्या विवंचनेंतून बाहेर पडण्यास आपल्यास मार्ग कसा सांपडत नाहीं याचीही विद्यार्थिनींना त्यांनीं जातां जातां माहिती करून दिली.

त्यानंतर दोन दिवसांची गोष्ट.

माधवरावांचा मधल्या सुटींतला कार्यक्रम जवळ जवळ ठरून गेल्यासारखा होता. तास संपवून परत आल्यानंतर ते ऑफिसांतल्या एका आराम खुर्चीवर अंग टाकून देत आणि प्रथम वारा घेण्यासाठीं म्हणून आणि वारा घेऊन झाल्यानंतर वाचण्यासाठीं म्हणून त्या दिवशींची ताजी वर्तमानपत्रें उचलीत. त्यांचीं वर्तमानपत्रें वाचून होतात न होतात तोंच चहा येई आणि चहा होतो न होतो तोंच सुटी संपल्याची घंटा होई.

नेहमींप्रमाणं आजहि त्यांनीं वर्तमानपत्रें उचललीं आणि वारा घेण्यास सुरवात केली—तोंच दाराशीं कुणाच्या तरी बिलवरांचा आवाज त्यांच्या कानीं आला.

'कोण आहे तिथें ?' त्यांनीं विचारलें.

दाराशीं घोंटाळणाऱ्या तीन चार मुली आंत आल्या.

'सर, तुम्ही परवां म्हणत होतां त्या लायब्ररीचं काय झालं ?' त्या मुलींपैकीं सकृद्दर्शनी हुषार आणि श्रीमंताची दिसणाऱ्या एका मुलीनें प्रश्न केला.

'काय व्हायचंय् ? ती माझी एक कल्पना होती. इतक्या लौकर ती अमलांत येईल असं मला नाहीं वाटत.'

'कां नाहीं अमलांत यायची ? काय अडचण आहे ?'

'तुम्हां मुलींवर रागवावं कीं तुमच्या प्रश्नांना उत्तरं द्यावींत हेंच आम्हांला समजत नाहीं.'

मास्तर अन् ते रागावणार !—

मुलींनीं मास्तरांचा स्वभाव केव्हांच छान ओळखून ठेविला होता.

'रागावूं नका सर,' ती हुषार मुलगी चट्कन् म्हणाली, 'आमच्या प्रश्नांचीं उत्तरं द्या.'

माधवरावांना हंसूं आवरलें नाहीं.

'हें पहा,' मास्तर म्हणाले, 'जिथें तिथें नडतो तो हा पैसा ! माझ्यासारखा खंबीर भिकारी सज्ज आहे तोंवर तुमच्या शाळेला कशाचीहि उणीव भासणार नाहीं. मात्र कुठलीहि गोष्ट थोडी दिरंगाईनं होते हें कांहीं खोटं नाहीं. ही जर मुलांची शाळा असती तर एव्हांना एक सोडून दोन लायब्ऱ्या स्थापन करतां आल्या असत्या.'

'त्या कशा ?'

'हें पाहिलंत ? काय छापलंय् या वर्तमानपत्रांत ? मुलांनीं एक नाटक करून दाखविलं नी नाटकाचं उत्पन्न सहाशें रुपये शाळेच्या इमारतफंडाला दिलं.'

'मग आम्ही तरी तसं कां करूं शकणार नाहीं ?'

'आं !—'

माधवरावांना विलक्षण आश्चर्य वाटलें. अशा तऱ्हेचा प्रश्न विचारला जाईल ही त्यांना कल्पनाच नव्हती.

आश्चर्याचा पहिला वेग किंचित् ओसरल्यावर ते शांतपणें म्हणाले, ' तुम्ही तें करूं शकणार नाहीं. कारण तुमचे पालक तुम्हांला परवानगी देतील असं मला वाटत नाहीं. '

' पण आम्ही जें करणार आहोंत तें शाळेकरितां करणार आहोंत, हें त्यांना कळल्यावर ते आम्हांला खात्रीनं परवानगी देतील.'

' ती तुमची भ्रामक कल्पना आहे. हवा तर तुम्ही प्रत्यक्ष अनुभव घेऊन पहा. '

या ठिकाणीं विषय तुटल्यासारखाच झाला. तेव्हां मुलींनींहि काढता पाय घेतला. तोंच माधवरावांचा चहा आला आणि तेहि खुर्चीवरून उठले.

ø ø ø

साडेपांचाचा ठोका पडतांच कुसुम बाहेर गच्चीवर येऊन उभी राहिली होती.

दादा कचेरींतून आल्याखेरीज तिनें चहा घ्यायचा नाहीं असा रिवाज कैक वर्षांपासून चालू होता. एकाद्या वेळीं दादा कुसुमहून लवकर घरीं आले तर कुसुमची वाट पहात थांबत.

कुसुमचे दादा शहरांतल्या सुधारकांचे पुढारी आणि बड्या पगाराचे सरकारी न्यायाधीश होते ही गोष्ट लक्षांत घेतल्यानंतर आमच्या वाचकांना कुसुमच्या रिवाजांत आश्चर्य मानण्यासारखें कांहीं होतें असें वाटणार नाहीं.

रावसाहेबांची कुसुम ही एकुलती एक लाडकी कन्या होती, ही गोष्ट सांगितल्यानंतर चहाच्या वेळेस त्या बापलेकींत कोणत्या तऱ्हेचा संवाद चालत असावा हें सांगण्याचीच जरूर नाहीं.

आज कुसुम गच्चीवर उभी होती तेव्हां दुपारीं मधल्या सुटींत झालेल्या संभाषणाचा प्रसंग एकसारखा तिच्या मनःचक्षूंसमोर उभा राही.

विशेषतः तिचें वाक्य—' आम्ही जें करणार आहोंत तें शाळेकरितां करणार आहोंत हें त्यांना कळल्यावर ते आम्हांला खात्रीनं परवानगी देतील ;' आणि त्यावर मास्तरांनीं उच्चारलेले ' ती तुमची भ्रामक कल्पना आहे. हवा तर तुम्ही प्रत्यक्ष अनुभव घेऊन पहा. ' हे शब्द जणूं कांहीं मोठ्या अक्षरांत कोरून ठेवल्याप्रमाणें तिच्या मनःचक्षूंना दिसत.

गच्चीवर तिला फार वेळ थांबावें लागलें नाहीं. कारण त्याच वेळीं रावसाहेबांची घोड्यांची गाडी बंगल्याच्या दरवाजासमोर उभी राहिली. रावसाहेब गाडींतून खालीं उतरले. कचेरींतून घरीं यावयास निघतांना कचेरीच्या आवारांतल्या बगीचाच्या माळ्यानें हातीं दिलेल्या गुलाबांच्या ताज्या फुलांचा गुच्छ त्यांच्या हातांत होता तो त्यांनीं मोठ्या प्रेमभरानें आपल्या लाडक्या मुलीच्या हातीं दिला आणि कपडे उतरून ठेवण्यासाठीं ते आपल्या दिवाणखान्यांत गेले.

माडीवर व्हरांड्यांत कुसुमनें नेहमींप्रमाणें चहाची तयारी केली. एका लहानशा वाटोळ्या मेजाभोंवतीं दोन खुर्च्या ठेवल्या आणि मेजावर चहाचा ट्रे ठेवला.

रावसाहेब आज भारीच खुषींत दिसत होते आणि ते असे खुषींत असले म्हणजे साहजिकच त्यांना विनोद करण्याची इच्छा होई. पण विनोदाच्या इच्छेला वाङ्मयाच्या अभ्यासानें आणि ललितकलांच्या आवडीनें जी जोड मिळते ती जोड त्यांच्या राकट व्यवहारी बुद्धीला केव्हांही मिळत नसल्यानें त्यांनीं केलेला विनोद त्यांच्या दृष्टीनें कितीहि नाजुक आणि खुमासदार असला तरी ऐकणाराला मात्र तो राकटच वाटत असे.

आजहि असेंच झालें.

विनोदाच्या बुद्धीनें ते म्हणाले, ' खरंच कुसुम, तुझं एकदां लग्न झालं नी तूं आपल्या नव्या घरीं गेलीस म्हणजे मला भारी एकटं वाटेल बुवा!'

' इश्श !—'

कुसुमनें एवढेच उद्गार काढले.

रावसाहेबांचा विनोद तिला आवडला नाहीं. तरी ते खुषींत आहेत आणि आपला विषय पुढें काढायला ही योग्य संधि आहे हें ओळखून कुसुम म्हणाली—

' दादा, मला एक गोष्ट करायला परवानगी द्याल का?'

चारदोन मैत्रिणींना घरीं बोलावून चहा द्यायची किंवा अशाच स्वरूपाची कुसुमची मागणी असेल असा विचार करून रावसाहेब म्हणतात, ' हो! हो!! अवश्य. पण ती गोष्ट कोणती हें तरी सांगशील कीं नाहीं ? '

' पहा हं दादा, नंतर म्हणाल ' नाहीं ' म्हणून ? '

कुसुमच्या या शब्दांनीं रावसाहेबांना थोडी शंका आली. आपल्याला सावरण्याच्या हेतूनें ते म्हणाले ' नाहीं म्हणण्याची पाळीच यायची नाहीं मुळीं! भलत्या गोष्टीची परवानगी मागायला तूं काय वेडी मुलगी आहेस ? '

' मुळींच नाहीं. ' कुसुम म्हणाली.

' आतां सांग पाहूं. ' रावसाहेब म्हणाले.

बसल्या जागेवरून हवेंत उड्डाण करण्यापूर्वी चिमणी ज्याप्रमाणें थोडा वेळ खालीं वांकल्यासारखें करते त्याप्रमाणें थोडा वेळ विचार केल्यासारखा करून कुसुम म्हणाली, ' आमच्या शाळेंत किनई एक लायब्ररी स्थापन करायची आहे. पण शाळेजवळ पुरेसा फंड नाहीं. आम्हां मुलींना लायब्ररीवांचून भारी अडतं. तेव्हां मुलांच्याप्रमाणें आम्ही मुलींनींहि ठरवलं आहे कीं आपण एकादं नाटक करावं नी—'

' आं!...समजलं. पुढं एक अक्षरदेखील बोलायची जरूर नाहीं. त्या नाटकांत काम करायला तुला परवानगी हवी, असंच ना? ती परवानगी तुला केव्हांहि मिळणार नाहीं. रावसाहेब देशमुखांची मुलगी नाटकांत तोंड रंगवून नाचायला लागली, असा दुर्लौकिक माझ्या कानांनीं केव्हांहि ऐकवणार नाहीं. '

'तसं नव्हे दादा! दादा, केवळ शाळेकरितां...'

'काय 'शाळेकरितां'! थांब. शाळेच्या अभिमानाचं हें भलतं खूळ वेळींच तुझ्या डोक्यांतून काढून टाकलं पाहिजे—'

त्यानंतर रावसाहेबांनीं चहादेखील घेतला नाहीं. तें तडक आपल्या दिवाणखान्यांत चालते झाले.

एका अजाण कुमारिकेची भोळी आशा!—

तिचा कल्पनावारु सैराट धावूं लागला. आजपर्यंत एकाच पुरुषाशीं तिचा अत्यंत निकट परिचय आलेला होता. आणि तो पुरुष म्हणजे तिचे दादा. त्या एका उदाहरणावरून तिनें सबंध पुरुषजातीविषयीं उतावीळपणें आपलें मत बनविण्यास सुरवात केली. 'पुरुषांना लौकिकाच्या नकली मानापुढें खऱ्या प्रीतीची आणि स्वार्थत्यागाची किंमतच कळत नाहीं का? दादांनीं माझ्याविषयीं आजपर्यंत दाखविलेलें सारें प्रेम केवळ हेतुमूलकच असेल का? किंबहुना साऱ्या पुरुषांचेंच प्रेम—'

दुसऱ्या दिवशीं दुपारीं पावणेबारा वाजतां एका हातांत पुस्तक आणि दुसऱ्या हातांत खडू अशा थाटांत सुपरिंटेंडंटसाहेब आपल्या नेमलेल्या वर्गावर जाणार तोंच रावसाहेबांकडचा एक मनुष्य सुपरिंटेंडंटसाहेबांच्या खोलींत आला.

त्यानें रावसाहेब देशमुखांचें पत्र माधवरावांच्या हातीं दिलें. पत्र वाचीत असतां एकाएकीं माधवरावांचा चेहरा खर्रकन् उतरला आणि ते मटकन् जवळच्या खुर्चीवर बसले.

थोड्या वेळानें अगदीं खालच्या आवाजांत त्यांनीं कारकुनास हांक मारून सांगितलें—'कुसुम देशमूखचं नांव काढा. तिला इथल्या मुलांच्या हायस्कुलांत पाठविण्याचा तिच्या वडिलांचा विचार आहे.'

गड्याला हांक मारून त्यांनीं एक चिठी लिहिली आणि ती मॅट्रिकच्या वर्गात नेऊन देण्यास सांगितलें—'कांहीं कारणामुळें मला आतां माझा तास घेतां येणार नाहीं.'

थोड्या वेळानें कारकुनानें लीव्हिंग सर्टिफिकेट सहीसाठीं सुपरिंटेंडंट-साहेबांच्या पुढें आणलें. कांपऱ्या हातानें साहेबांनीं सर्टिफिकेटवर सही केली.

—त्याच वेळीं पलीकडच्या वर्गांत इतिहासचे मास्तर सांगत होते—'कोंडाणा किल्ला तानाजी मालुसऱ्यांनीं जिंकून घेतला. पण लढाईत तानाजी मालुसरे पडल्यामुळें शिवाजी महाराजांना अतिशय दुःख झालें व ते म्हणाले, 'गड आला पण सिंह गेला.' म्हणून कोंडाण्याला सिंहगड असें नांव मिळालें.—'

'स्त्री'—आक्टोबर १९३४.

---

# कल्पना-विलास : २१

जुन्या पिढींतल्या एखाद्या गृहस्थाला — मग तो कितीहि ‘ सुधारक ’ असो—आपली मुलगी कुठल्या तरी ‘ भानगडीं ’त आहे असें कळतांच धक्का बसावा यांत आश्चर्य तें काय ?

दादासाहेब नित्याप्रमाणें त्या दिवशींहि संध्याकाळीं क्लबांत गेले होते. क्लबांतून ते आणि अण्णाराव एकदमच घरीं परत यायला निघाले. वाटेंत अण्णाराव दादासाहेबांना हलक्या आवाजांत म्हणतात—

‘ सहज माझ्या कानावर आलं—खरं नसेलहि कदाचित् तें ! ’—

दादासाहेबांची उत्सुकता जागी झाली.

‘ काय ?’ दादासाहेबांनीं विचारलें.

‘ तसं कांहीं विशेष नाहीं. अलीकडच्या मुलांचं हें असं थोडंबहुत चालायचंच ’

‘ म्हणजे ?’

' दादासाहेब, आपला फार जुना स्नेह—म्हणून एकदां वाटतं तुमच्या कानांवर ठेवलेलं बरं. पण फिरून असंहि वाटतं कीं तें खरं नसेल तर निष्कारण तुमच्या जिवाला त्रास दिल्याचं पाप माथीं बसायचं ?'

' अशा पाठशिवणीच्या खेळानं मला सतावूं नका. एकदम काय तें स्पष्ट सांगून टाका पाहूं. '

' राग नाहीं ना येणार ! '

' राग ? आणि तो तुमच्याबद्दल ? छे ! '

' मग सांगतो तर. आपली मुलगी कल्पना, तो विलास म्हणून कुणी एक भाई आहे ना, त्याच्याशीं प्रेमविवाह करणार आहे असं ऐकलं. खरं नसेलहि तें. पण लोक काय बोलतात तें आपलं तुम्हाला कळलेलं असावं. '

दादासाहेबांना आश्चर्यमिश्रित दुःखाचा धक्का बसला.

त्या मनःस्थितींत ते मुकाट्यानें चालत होते. मध्यंतरीं अण्णारावांनीं त्यांचा केव्हां निरोप घेतला हेंहि त्यांच्या नीटसें लक्षांत आलें नाहीं.

ते घरीं आले. आपल्या दिवाणखान्यांत जातां जातां त्यांनीं कल्पनेच्या खोलींत डोकावून पाहिलें. कल्पना कायसें लिहिण्यांत गढून गेलेली होती.

खऱ्याखोट्याची शहानिशा ताडकन् करून टाकावी असें त्यांच्या मनांत आलें; आणि—

पण फिरून त्यांना काय वाटलें कोण जाणे, ते कल्पनेच्या खोलींत गेले नाहींत तर दारांतूनच परस्पर दिवाणखान्यांत गेले.

त्यांनीं कपडे उतरून ठेवले. थोडा वेळ विचारांत घालविला आणि मग हांक मारली—

' कल्पना ऽ '

' आले हं ऽ '

वडिलांच्या हांकेला उत्तर देऊन ' सर्वस्वी तुमचीच—कल्पना ' असं लिहून तिनं तें पत्र संपविलं आणि लिहिण्याचं पॅड बंद केलं.

ती दादासाहेबांच्या खोलींत आली तेव्हां दादासाहेब आपल्या नेह-मींच्या मोठ्या आरामखुर्चीत बसलेले होते. गंभीर विचार करतांना आपल्या डाव्या हाताचा तळवा आपल्या डोक्यावर ठेवण्याची त्यांची लकब असे. या वेळीं दादासाहेबांना पाहतांच ते कसल्या तरी गंभीर विचारांत आहेत हें कल्पनेनं तात्काळ जाणलं.

‘ कल्पना, ती खुर्ची घेऊन इथं जवळ ये. ’

दादासाहेबांच्या समोर कल्पनेनं आपली खुर्ची ठेवली.

‘ बैस त्या खुर्चीवर. मला तुला कांहीं विचारायचं आहे,–कांहीं सांगा-यचं आहे. ’

विलासवरील आपल्या प्रीतीचा सुगावा दादासाहेबांना लागला तर नाहीं ना, अशी शंका तेवढ्यांत कल्पनेला येऊन गेलीच.

‘ तुला असं विचारायचं आहे, कीं विलास नांवाच्या एका भाईशीं तूं लग्न करणार आहेस असं कांहीं लोक बोलतात, तें खरं आहे का ? खरं असेल तें सांग. ’

‘ खरं आहे. ’

‘ काय ! खरं आहे ? ’ खुर्चीत सरळ बसत दादासाहेबांनीं विचारलें. त्यांचा चेहरा एकदम काळाठिक्कर पडला. क्षणभरानें ते फिरून मागें रेलले.

‘ कल्पना, तूं जाणती आहेस—सुशिक्षित आहेस. तुझ्या आईच्या पश्चात् तुझी कोणत्याहि दृष्टीनं मीं आबाळ होऊं दिली नाहीं. यंदा तूं बी. ए. होशील. एखाद्या योग्य वराशीं तुझं लग्न झालं असतं तर तूं जन्माची सुखी झाली असतीस, आणि मलाहि समाधान वाटलं असतं. ’

‘ म्हणजे विलास अयोग्य आहेत असं का म्हणायचं आहे तुम्हांला ? ’

‘ हो ! असंच म्हणायचं आहे मला. जगांत सुखी व्हायचं असेल तर मनुष्याजवळ पहिली गोष्ट म्हणजे पैसा असला पाहिजे. दुसरी गोष्ट म्हणजे समाजांत मान्यता असली पाहिजे. सुखी होण्यास आणखीहि कांहीं

गोष्टी जरूर आहेत. पण त्या महत्त्वाच्या नाहींत. भाई—पंथांत शिरणारा प्रत्येक तरुण हा कंगाल असतो. निदान समाजाच्या मान्यतेच्या दृष्टीनं तरी कंगालच असतो. त्याच्या बेछुट वागण्यानं आणि बरळण्यानं त्याची समाजांतली मान्यता नाहींशी झालेली असते. अशा एखाद्या कंगालाशीं तुझं लग्न झालं तर तूं कशी सुखी होणार? कल्पना, अजून तूं अल्लड आहेस, अननुभवी आहेस. मी जगांत साठ पावसाळे पाहिलेले आहेत. गरिबीच्या रौरव नरकापासून श्रीमंतीच्या स्वर्गापर्यंत प्रत्येक अवस्थेंतून मीं प्रवास केलेला आहे. माझ्या प्रत्येक शब्दामागं साठ वर्षांचा खडतर अनु-भव उभा आहे. म्हणूनच तुला कळवळून सांगावसं वाटतं, कीं हा लग्नाचा विचार तूं सोडून दे. इतक्याउप्पर तुला तुझा बेतच तडीस न्यायचा असेल तर माझी म्हाताऱ्याची कांहीं आडकाठी असूनहि तिचा उपयोग नाहीं हें उघड दिसतंय मला. पण तसं झालं तर माझ्या आत्म्याला कधींहि समाधान लाभणार नाहीं.'

बोलतां बोलतां ते आपल्या जागेवरून उठले आणि इकडे तिकडे येरझारा घालूं लागले. त्यांचे डोळे ओले झाले आणि गळाहि दाटून आला.

आंसवें भरल्या डोळयांनीं त्यांनीं कल्पनेच्या आईच्या मोठ्या तसबिरी-कडे पाहिलें.

'पहा, पहा तिच्याकडे. तिच्याहि डोळयांत आंसवं उभीं राहिलेलीं दिसत नाहींत तुला!'

आपल्या वडिलांच्या व्याकुळ हृदयाची कल्पनेला चांगलीच कल्पना आली असावी.

ती चटकन् उठली आणि वडिलांच्या हातावर डोकं ठेवून म्हणाली — 'दादा, तुम्हांला वाईट वाटेल असं मी कांहीं करणार नाहीं.'

'खरंच कां हें!' क्षणार्धात तें जरठ झाड आनंदाच्या फळाफुलांनीं बहरून आलें.

'खरं–अगदीं खरं.'

'आहेच तशी माझी शहाणी छबी!'

—आणि कल्पना लहान होती तेव्हां लाडानं ते तिच्या गालांवर जशी हळूच चापटी देत तशी याहि वेळीं त्यांनीं एक दिली.

त्यानंतर ती परत आपल्या खोलींत आली. थोड्या वेळापूर्वीं तिनें विलासला लिहिलेलें पत्र ज्या पॅडमध्ये टेवलेलें होतें तें अद्यापहि टेबलावरच होतें. टेबलावरच्या विजेच्या दिव्याच्या प्रखर प्रकाशांत तें फार भेसूर दिसतें असें तिला वाटलें म्हणून चटकन् तिनें दिवा बंद केला आणि तुळईस टांगलेला मंद निळा दिवा सुरू केला.

कॉटवर तिनें आपलें शरीर टाकून दिलें. तिच्या मनावर विलक्षण खिन्नता आलेली होती. त्या खिन्नतेचा अर्थ तिचा तिलाच कळत नव्हता. ज्यांनीं प्राणापलीकडे तिला जतन केलं आणि शिक्षण दिलं त्या जन्मदात्याला सुखी केल्याबद्दल तिच्या मनास समाधान कां बरं होत नव्हतं!—विलास ...! वडिलांना सुख द्यायचं तर विलासना सुखी करणं शक्य नव्हतं. आणि विलासना सुखी करायचं तर वडिलांना सुख देणं शक्य नव्हतं.

जेवण तयार असल्याची वर्दी आली तेव्हां भूक नसल्याचं नी झोप आल्याच कारण सांगून तिनं वर्दी आणणाऱ्याला परत पाठविलं. मग दाराला आंतून कडी लावली. निळा दिवा बंद केला. टेबलावरचा दिवा सुरू केला आणि फाउन्टनपेन काढून तिनं लिहिण्यास सुरवात केली—

प्रिय विलास,

तुम्हाला एक अप्रिय गोष्ट कळविण्यासाठीं मी लिहावयास बसलें आहें. कांहीं दिवसांपूर्वीं आपणा उभयतांच्या लग्नाचं आपण निश्चित केलं होतं. पण आपलं लग्न माझ्या वडिलांस मुळींच पसंत नाहीं. आपल्या विवाहाची बातमी कळताच त्यांच्या जिवाला केवढ्या तरी वेदना झाल्या! तुम्हांला कधींच कल्पना नाहीं यायची त्या वेदनांची. माझे

अनेक लाड आजपर्यंत त्यांनीं पुरे केले. माझ्या विवाहासंबंधींचे लाडही ते पुरे करतील अशी माझी कल्पना होती; पण माझी कल्पना चुकीची ठरली आहे! त्यांच्या इच्छेविरुद्ध मी तुमच्याशीं विवाह करण्यास तयार झालें तर ते काडीचाहि विरोध करणार नाहींत. म्हणूनच तर त्यांच्या जिवाला दुखविण्याचं माझ्या इतकं जिवावर आलं आहे. तेव्हां आपला विवाह निदान सध्यां तरी शक्य नाहीं.

सर्वस्वी तुमचीच,
**कल्पना.**

ॐ ॐ ॐ

पोस्टमननें तें पत्र विलासला आणून दिलें त्या वेळीं तो एका सभेस जाण्याच्या घाईत होता. सुभाषबाबूंच्या बाबतींत कॉंग्रेस हायकमांडनें जो अन्याय केला होता त्याच्या निषेधार्थ सभा होती ती आणि तींत विलासचं भाषण व्हायचं होतं.

लिफाफ्यावरील हस्ताक्षरावरून तें पत्र कुणाकडून आलं आहे हें विलासनं चटकन् ओळखलं. लागलींच लिफाफा फोडून त्यानं पत्र वाचण्यास सुरवात केली.

कल्पनेशीं विवाह होणं निदान सध्यां तरी शक्य नाहीं!—किती भयंकर कल्पना! पुढचं कुणी पाहिलं आहे? त्या पुढच्या सुखावर आशा ठेवून किती दिवस रहायचं?—त्याला कांहीं सुचेना. चोहींकडे एकदम अंधार झाल्यासारखं त्याला वाटलं. आरामखुर्चींत अंग टाकून तो स्वस्थ पडून राहिला.

थोड्याच वेळांत त्याच्या दाराशीं एक मोटार थांबली. सभेची वेळ झाली तरी विलास आला नाहीं हें पाहतांच चालकांनीं ती मोटार पाठविली होती.

स्वयंसेवकानें विलासला सभास्थानाकडे चलण्याची विनंती केली. आपल्या खासगी आयुष्याचा आपल्या सार्वजनिक आयुष्यावर परिणाम

होऊं देणं योग्य नव्हे असा विचार करून तो स्वयंसेवकाबरोबर मोटारींत जाऊन बसला.

मोटारचीं चाकें फिरूं लागलीं तसें त्याचें विचारचक्रहि सुरूं झालें—

...कल्पना! कल्पना हा मानवजातीला निसर्गानं दिलेला शाप आहे कीं वर आहे? वर आहे म्हणावं, तर या कल्पनेनं मानवजातीच्या सुखांत किती तरी माती कालविली आहे! जनावरांना कल्पना नसते. भूक लागली कीं तीं अन्न खातात, तहान लागली कीं पाणी पितात. जन्मसिद्ध प्रेरणांच्या अनुरोधानं त्यांचा सारा जीवनक्रम चाललेला असतो. माणसं मात्र जुन्या दुःखांचीं मढीं उकरून काढतात नी रडत बसतात. नाहीं तर भावी काळाचीं भेसूर चित्रं कल्पनेनं रंगवितात नी कष्टी होतात. तेव्हां जनावरं माणसांपेक्षां किती तरी सुखी!--छे! असंहि म्हणतां येत नाहीं. मनुष्याजवळ कल्पना नसती तर आजहि मानवप्राणी गिरिकंदरांतून भटकत राहिला असता. माणसांत दिव्यत्व कांहीं असेल तर तें म्हणजे त्याच्या ठिकाणची कल्पनाच. त्या कल्पनेच्या आधारानंच माणूस जीवनसंग्रामांत बेडर वृत्तीनं लढायला तयार होतो. त्या कल्पनेचा विलास...

'कल्पनेचा विलास' ह्या विचाराबरोबर विलास दचकला. त्याचें विचारचक्र एकदम थांबलें आणि मोटारहि ब्रेकचा खर्रर आवाज करून थांबली. त्यानें पाहिलें सभेच्या ठिकाणीं तो आला होता.

त्याची मोटार सभास्थानीं पोहोचतांच तिथें जमलेल्या शेकडों लोकांनीं एकच जयघोष केला—'बाबू सुभाषचंद्र बोस की जय!' 'भारतमाता की जय!'

यशवंत—दिवाळी अंक १९३९.

